# पुण्यधाम सेवाग्राम

प्रेमा कंटक



चार रुपये

# दो शब्द

'पुण्यधाम सेवाग्राम' पुस्तक लिखकर कुमारी प्रेमाबहन कंटक ने एक बहुत स्तुत्य व उपयोगी कार्य किया है। इस पुस्तक में उन्होने सेवाग्राम आश्रम की व्यवस्थित जानकारी प्रस्तुत की है जिससे पाठको को पूज्य बापूजी व पूज्य बा की प्रवृत्तियो का गहरा ज्ञान प्राप्त हो सकेगा।

पुस्तक में राष्ट्रपिता गाधीजी के जीवन के विभिन्न पहलुओ के विवेचन के अलावा महिला-आश्रम आदि वर्धा की सस्थाओ की जानकारी भी दी गई है। पूज्य बापूजी के नजदीक के साथी श्री किशोरलालभाई, श्री जमनालालजी, श्रद्धेय जाजूजी व श्री धर्मानद कौसम्बी के जीवन की झलक भी मिल सकेगी।

लेखिका न इस पुस्तक को तैयार करने मे जो अथक परिश्रम किया है उसके लिए मैं सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान की ओर से उन्हे हार्दिक धन्यवाद व बधाई देता हू। गाधी-शताब्दी के अवसर पर सेवाग्राम आनेवाले अतिथियो व कार्यकर्ताओ को यह पुस्तक रुचिकर प्रतीत होगी ऐसी आशा है।

श्रीमन्नारायण

राजभवन,
अहमदाबाद,
२६ दिसबर, १९६८

---

सर्व हक्क प्रकाशकाधीन २६ जानेवारी १९६९ प्रथमावृत्ति १५०० प्रति
प्रकाशक – प्रभाकरजी, मत्री, सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान, सेवाग्राम (वर्धा)
मुद्रक – रामभाऊ म्हसकर, परधाम मुद्रणालय, पवनार, वर्धा




१. पुस्तक विक्री भाडार   २ आदि निवास   ३. रसोडा   ४. पुस्तक विक्रीची जुनी जागा   ५. आश्रम कुआँ   ६. कस्तूरबा कुटी   ७. आखिरी निवास   ८. बापू कुटी   ९. बापू दफ्तर   १०. परचुरे कुटी   ११. किशोर निवास   १२. महादेव देसाई कुटी   १३. कार्यकर्ता निवास   १४. आश्रम कार्यालय   १५. प्रार्थना भूमि.

*भक्तांची ते जाती ऐसी ।*
*सर्वस्वासी मुकावें ।।*

— तुकाराम

माझे मित्र माझा सर्वोच्च बहुमान दोन प्रकारे करू शकतील. मी दिलेला कार्यक्रम त्यांनी आपल्या जीवनात अमलात आणावा किंवा त्यावर त्याचा विश्वास नसेल तर आपल्या सर्व शक्तीने त्यानीं मला विरोध करावा.

यंग अिण्डिया १२ ६.२४ महात्मा गांधी

वस्तुस्थिति अशी आहे की अहिंसेच्या भक्ताला उपयुक्ततावादी मतप्रणालीला मान्यता देतां येत नाही. (उपयुक्ततावाद = बहुसंख्याकाचें अधिकतम हित). तो सर्वांच्या हितासाठी झटेल आणि त्या ध्येयाच्या पूर्तीसाठी प्रयत्न करीत निधन पावेल. म्हणून इतरानी जगावें यासाठी तो खुशीने मरण पतकरील. स्वत: मरून तो इतरांबरोबर स्वत:ची सेवा करील. सर्वांच्या परम हितांत बहुसंख्याकाचे हित अपरिहार्यपणे साधलें जाते आणि म्हणून तो व उपयुक्ततावादी आपल्या जीवनक्रमात अनेक वेळा जवळ आले तरी अशी एक वेळ येईल की, त्या वेळी त्यांना विभक्त व्हावेच लागेल आणि विरुद्ध दिशानीही काम करावें लागेल. तर्काला धरून सांगावयाचें तर उपयुक्ततावादी कधीच आत्मार्पण करणार नाही. अहिंसावादी स्वत चे बलिदानही देईल.

यंग अिण्डिया ९.१२.२६ महात्मा गांधी

# पुण्यधामाचा परिचय

दक्षिण आफ्रिका ही गांधीजींची प्रयोगभूमि होती. गांधीजींना तेथे मानवतेचे विराट दर्शन घडले आणि महायुद्धाच्या वणव्यातून मनुष्यजातीला वाचविण्यासाठी सत्याग्रहासारख्या सात्त्विक तेजस्वी साधनेचे दर्शनही त्यांना तेथें घडले. तेथील अनुभव बरोबर घेऊन ते स्वत:च्या कर्मभूमीत आले आणि रचनात्मक कार्यक्रमाच्या जोरावर राष्ट्राला राष्ट्रीय एकतेचे दर्शन घडवून त्यांनी देशाला स्वतंत्र केले. या महान् राष्ट्रीय प्रयोगाच्या काळात गांधींचे स्थायी वास्तव्य दोन ठिकाणी होते. १९१५ ते १९३० पर्यंत अहमदाबाद-साबरमती आणि त्यानंतर १९३६ ते जवळजवळ शेवटपर्यंत त्यांचे वास्तव्य होते सेवाग्राम-वर्धा येथें. या दोन्ही स्थानांचा स्वतंत्र इतिहास जगाला मिळाला पाहिजे. साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमाचा इतिहास मी गांधीजींजवळ मागितला. येरवडा जेलमध्यें असतांना त्यांनी या इतिहासाची थोडी-शी टांचणे लिहून काढली होती. त्यांना स्वत:ला ती संतोषकारक वाटली नव्हती, पण त्यांच्या देहान्तानंतर ती तशीच छापून काढण्या-खेरीज गत्यंतर नव्हते

सेवाग्रामच्या आश्रमाचा इतिहास १९३६पासून शेवटपर्यंत तेथें राहाणाऱ्या कोणीतरी दिला पाहिजे. हे काम कोणी करावे हेंहि अजून ठरले नाही. पण त्या दरम्यान 'पुण्यधाम सेवाग्राम'ची बरीचशी संस्मरणे ताजी व्हावीत किंवा उपलब्ध असावीत या हेतूने गांधी-परिवारातील राष्ट्रसेविका कुमारी प्रेमाबाई कंटक यांनी हे छोटे-खानी पण गोड पुस्तक लिहिलेले आहे प्रेमाबाई जशा साबरमती आश्रमात राहिल्या होत्या आणि तेथें त्यांनी गांधीजींच्या देखरेखीखाली महत्त्वाची कामें केली होती तसा अनुभव त्यांना महाराष्ट्रात असूनहि सेवाग्रामच्या बाबतीत मिळाला नाही. बरीचशी माहिती त्यांना सेवाग्रामात राहिलेल्या लोकांपासूनच मिळवावी लागली. ती गोळा करून त्यांना एक सांगोपांग इतिहास लिहिता आला असता. पण ते

काम स्वत.चें नव्हे असे जाणून त्यांनी ही त्रोटक संस्मरणें लिहिली आहेत. आणि यासाठी सेवाग्राम विषयक जे काही पांचपन्नास फोटो त्याना मिळाले त्याचा उत्तम उपयोग त्यानी येथें केला आहे.

पुस्तकाचें महत्त्व पाहाता या छायाचित्राचे प्रकाशन अधिक चागल्या रीतीनें व्हावयास पाहिजे होते. तरीहि इतकी चित्रें गोळा केली आणि त्यांचा संदर्भ येथें नमूद केला ही सेवा थोडीथोडकी नाही.

उपयोगी पुस्तक शक्य तितक्या लवकर हातावेगळें व्हावें आणि गांधी-जन्म-शताब्दीच्या प्रारंभीच ते लोकांच्या हातीं पडावें म्हणून प्रेमाबाईनीं स्वतःवर संयमाचें मोठें बंधन घातले आहे.

गांधीजींनी परचुरे शास्त्रीची सेवा सेवाग्राम येथें केली तिचें वर्णन करीत असतांना त्याना दत्तपूरच्या कुष्ठाश्रमाचा उल्लेख करावाच लागला. पण त्याचप्रकारचें काम तितक्याच आस्थेनें आणि तशाच गांधी-पद्धतीनें अमरावतीजवळ श्री शिवाजीराव पटवर्धन करतात त्यानी आठवण प्रेमाबेनना न होणें शक्यच नाही. पण तें त्याच्या मर्यादेंत बसलें नसावें.

प्रेमाबाई स्वत सेवाग्रामात राहिल्या नव्हत्या. तरीहि त्यानी गाधीजीच्या या १२-१५ वर्षाच्या काळातील लहानमोठ्या असख्य प्रसगाचा उल्लेख येथे करून गाधी-साहित्यात एक मोठी भर घातली आहे आणि गाधीयुगाचा इतिहास लिहिणाऱ्याची बरीचशी सोय केली आहे. गाधीजीचे राष्ट्रकार्य जगाच्या पुढें आहेच. गाधीजीनी सुरू केलेली आणि चालविलेली अनेक प्रकारची रचनात्मक कामे आजहि कमीअधिक प्रमाणात विकसित होत असलेली आपण पाहतो. पण गाधीजीनी ज्या असख्य व्यक्तीना सविस्तर सल्ला-सूचना देऊन घडविले आणि त्याच्या कुटुबात प्रवेश करून सामाजिक जीवनाला नवे, विशुद्ध आणि प्रेरक वळण लावले त्याचा इतिहास आपल्याला कुठून मिळणार ? गाधीजीच्या या मौलिक क्षेत्राचा उल्लेख 'पुण्यधाम सेवाग्रामा'त तुरळक मिळतो यामुळें देखील या पुस्तकाचे महत्त्व वाढले आहे.

दक्षिण आफ्रिकेतील आपले काम पुरे करून हिंदुस्थानात आल्या-नतर गाधीजीनी जी राष्ट्रसेवा केली आणि आपल्या मानवसेवेत भर घातली, तिचा उत्तरार्ध प्रस्तुत पुस्तकात प्रतिबिंबित झाला आहे एवढ्याचसाठी या काळातील अनुभवी वाचकानी आपापल्यापरी विविध माहिती प्रेमाबाईकडे पाठविली पाहिजे. आणि त्यानी वेळात वेळ काढून यथाकाळी या पुस्तकाची सुधारून वाढविलेली नवी आवृत्ति गाधीप्रेमी जगाला दिली पाहिजे. ज्यानी चागले काम केले त्याचेकडूनच अधिक सेवेची अपेक्षा केली जाते.

२५-१२-६८ काका कालेलकर

# हृद्गत

ता. १ जून १९६७ रोजी मी सेवाग्राम आश्रमात रहावयास आले त्या सुमारास श्री अण्णासाहेब सहस्रबुद्धे यानी मला सुचवले की, सेवाग्राम आश्रमाची स्थापना झाल्यापासून तो महात्मा गांधीच्या अवसानापर्यंतचा आश्रमाचा इतिहास फोटोच्या साहाय्याने लिहून काढावा. फोटो फक्त सेवाग्राम आश्रमात घेतलेलेच असावेत. या पुस्तकाचे प्रयोजनही त्यानी सांगितले. दर वर्षी सेवाग्राम आश्रम पहाण्यासाठी सुमारे तीस हजार लोक येत असतात. त्याच्या माहितीसाठी असे एखादे पुस्तक फार उपयोगी सिद्ध होईल असे त्याचे मत पडले. अर्थात् असे पुस्तक "अती साजिरे, स्वल्प, सोपे" व कमी किमतीचे असावे असेही त्याचे मत होते. त्याची पुस्तकाबद्दलची कल्पना बहुधा Guide (मार्गदर्शिका) या रूपाची असावी. पण पुस्तक माझ्या मनात घोळू लागल्यावर मी त्याना कळवले की, "माझ्याकडून तसले पुस्तक लिहिले जाणार नाही. पुस्तक साहित्यिक रूपाचे होईल." त्यानी संमति दिली व मी साधने गोळा करण्याच्या मार्गास लागले.

नोव्हेंबर १९६७च्या अखेरीस श्री कनु गांधी याचेकडून पन्नास फोटो आले. त्यांच्यातूनही निवड करावी लागली. सन १९४० साली स्व. श्री महादेवभाई देसाई यानी कनु गांधीचे काही फोटो आधारास घेऊन मुंबईच्या Illustrated Weekly साठी लेख लिहिला होता, तोही कनु गांधीनी मला पाठवून दिला. श्री बलवतसिंह याचे पुस्तक "बापू की छाया मे" आणि श्री चिमनलालभाई शाह याची नोंदवही याचाच मुख्यत्वेकरून पुस्तकलेखनाच्या कामी उपयोग झाला आहे.

पुढे १२ व १३ फेब्रुवारी १९६८ रोजी सेवाग्रामच्या आश्रमात सेवाग्राम आश्रम प्रतिष्ठान संस्थेची बैठक भरली होती, तीत या पुस्तकाबाबत चर्चा होऊन ते प्रतिष्ठानने छापावे व २ ऑक्टोबर १९६९ पर्यंत त्याचे हिंदी व इंग्रजी अनुवाद छापून प्रसिद्ध करावे असा ठराव संमत झाला.

त्यानतर महात्मा गांधी राष्ट्रीय स्मारक निधीचे मंत्रि श्री देवेन्द्रकुमार गुप्ता यांनी मला दिल्लीस बोलावून नेले व त्यांच्या संग्रहालयातील फोटोतून निवड करण्यास सांगितले त्याप्रमाणे तेथूनही आणखी फोटो आणले. तथापि ज्या फोटोची माहिती मिळू शकली तेच या पुस्तकात देता आले, बाकीचे देता आले नाहीत.

छापण्यासाठी काढावयाच्या फोटोचे एक तंत्र असते ते वापरल्यास फोटो चांगले छापले जातात. पुस्तकातील सारेच फोटो या तंत्र-पद्धतीने काढले गेले नसल्यामुळे काही फोटो अस्पष्ट आले आहेत. हिंदी व इंग्रजी अनुवादात याहून अधिक स्पष्ट देण्याचा प्रयत्न होईल

★ ★ ★

हे पुस्तक लिहिताना मला कसलेच परिश्रम करावे लागले नाहीत वा कष्टही झाले नाहीत माझे महान् सद्‌गुरु आज शरीराने जवळ नसले तरी त्यांचे चैतन्य कायम आहेच त्यांचे दिव्य व्यक्तिमत्व व भव्य , पार्थ यांचे वर्णन करताना मन आणि लेखणी नवजीवनाचा अनुभव घेत होती! पवित्र स्मरणे ताजी होत होती!

मेरी उनकी प्रीति पुरानी, उनबिन पल न रहाऊँ ।।

—मीरा

श्रीसद्‌गुरूंच्या लीला लिहिताना मन भावसमाधीत गढून गेल्यावर कष्टाची जाणीव कोठून होणार? लेखन हा एक आनंदाचा विषय झाला होता!

आश्रम
सेवाग्राम
जि वर्धा
३१ १२.६८

प्रेमा कंटक

# अनुक्रमणिका



---

शुद्धिपत्र -- पृष्ठ ११ वरून दुसरी ओळ 'वय केवळ बारा वर्षांचे होते' या ऐवजी 'वय केवळ तेरा वर्षांचे होतें' असे वाचावे.

पृष्ठ १५३, वरून ६ वी ओळ 'दूरचे चुलत बंधु' च्या ऐवजी 'सख्खे चुलत बंधु' वाचावे

# १ सेवाग्रामची "बापूकुटी"

* जेथ आराणुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे।
वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ।।१६४।।
जो संतीं वसविला ठावो । संतोषासि वावो ।
मना होय उत्सावो । धैर्याचा ।।१६५।।

— ज्ञानेश्वरी, अध्याय ६

इसवी सन १९३० मध्यें मिठाच्या सत्याग्रहापासून सुरू केलेली देशव्यापी कायदेभगाची चळवळ महात्मा गाधीनी सन १९३४च्या मध्यास मागें घेतल्यावर त्यानी खेडचाकडे आपले लक्ष वळविले. सुमारे दीड वर्ष वर्धा येथें राहून त्यानी ग्रामोद्योगाचे पुनरुज्जीवन, ग्रामसफाई, आहार-विषयक प्रयोग वगैरे प्रवृत्ति चालविल्या. तथापि त्याना संतोष नव्हता शेवटी खेडयात जाऊन राहाण्याचा निर्णय त्यानी घेतला व ता. ३० एप्रिल १९३६ रोजी पहाटे पाच वाजता त्यानी वर्ध्याहून सेगावला प्रयाण केले त्यावेळी ते तेथें चारपाच दिवस राहिले. खेडचातील लोकाना गोळा करून आपले उद्दिष्ट त्याना सागितले. लोकानी त्याच्या तेथील निवासास संमति दिली. गाधीजीना राहावयास घर नव्हते. पहिली झोपडी "आदि-निवास" त्यावेळी बाधली जात होती. गाधीजी परत वर्ध्यास गेले व सुमारे दोन महिन्यानी १६ जूनला परत सेगावला आले ते कायम तेथे वस्ती करून राहिले.

वर्ध्याहून चार मैल अतरावर सेगाव होते. ते स्व. जमनालाल बजाज याच्या मालगुजारीपैकी होते. त्याच्या आसपास स्व. जमनालालजीची शेतजमीन होती. तीपैकी एक एकर जमीन गाधीजींनी

---

* अर्थ — ज्या ठिकाणी सहज बसले असता असे समाधान प्राप्त होत की, तेथून उठावे असे वाटत नाही व जें पाहिल्याबरोबरच वैराग्यास दुप्पट जोर येतो जेथें संतानी वास्तव्य केले आहे आणि ज्या ठिकाणी समाधानाला साहाय्य मिळून मनाला धैर्याचा उल्हास येतो. — श्री मानोपत दाडेकर

सुरवातीस उपयोगात आणली तीवरच आश्रमाच्या विविध झोपड्याची उभारणी झाली

आरभी गाधीजी आपल्या परिवारासह आदि-निवास मध्ये राहात होते नतर त्याच्या उत्तरेस सुमारे ७५ फूट अतरावर मीरा-बहन यानी स्वत साठी एक छोटी झोपडी वाधली पुढे आदि-निवासात खप गर्दी झाल्यामुळे गाधीजी तीत राहावयास गेले व मीराबहनर्नी तिच्या पूर्वेस दुसरी झोपडी स्वत साठी वाधली. नतर तीहि त्यानी सोडली या दोन्ही झोपड्या पुढे "वापू-कुटी" व "वापू-दप्तर" या नावानी प्रसिद्ध झाल्या.

बापू-कुटीची नतर थोडी वाढ करण्यात आली. खेड्यातील गरीब लोकाच्या जीवनाशी समरस होण्याची मनीषा बाळगून गाधीजी सेगावला आले होते भारतातील करोडो शेतकऱ्याचे ते प्रतिनिधि होते त्यामुळें त्याच्यापेक्षा वेगळें व खर्चाळ जीवन त्याना पसत कसे पडावे ? ही झोपडी शिंदीच्या झाडाची लाव पाने (झावळ्या) व कच्ची माती याची वनवलेली आहे भिंती घोटीव दिसतात. मीरा-वहननी भिंतीवर गावठी चित्रें स्वहस्ते उठवली आहेत सेगावमध्यें जागोजागी दिसून येणारी शिंदीची झाडें व मोर याच्या प्रतिकृति आहेत ध्यानाचे लक्ष्य ॐ कार व कर्माचा सूचक चरखा ही दोन्ही प्रतीकें भिंतीवर विराजमान आहेत छपरावर गावठी कौलें वसविली आहेत. खोल्या, खिडक्या, दारे आदि सर्वांची घडण गावठीच आहे. वसावयास गवताच्या चटया – वेरळ किंवा जपानहून आणलेल्या नव्हत, तर सेगावात तयार झालेल्या – पसरल्या आहेत गाधीजीची वैठक खादीच्या शुभ्र वस्त्रानी आच्छादिलेली आहे मोजकें व आवश्यक तेवढेंच सामान तेथें ठेवले जात असे अपरिग्रहाचा नमुना या कुटीत प्रत्यक्ष दिसतो भिंतीवर चित्रें नसत पण सदाचार व सद्विचार याची द्योतक वचनें टागलेली असत. आजही ती तेथें दिसून येतात वाऱ्याने कागद उडून जाऊ नयेत म्हणून त्याचेवर वजन ठेवण्याकरिता गाधीजी दगडाचा उपयोग करीत ते दगड आपल्या प्रकृतिमातेची मानदानी व्यक्त करणारे ओवडधोवड पण आकर्षक असत. तथापि त्याच्या खोलीतील सर्वांत आकर्षक वस्तु म्हणजे

चिनीमातीची बनविलेली, बाळखेळण्यासारखी शोभणारी मर्कटनयी होय! तीन इवलीशी माकडें! एकाने आपल्या दोन्ही हातानी स्वत चे डोळे झाकलेले, दुसऱ्याने आपले दोन्ही कान झाकलेले व तिसऱ्याने आपले तोड झाकून घेतलेले!! हे मातीचे चित्र गाधीजीना प्रवासातही सोबत करीत असे सतत जागरूक राहण्यासाठी आपण त्यास आपल्या दृष्टीसमोर ठेवतो, असे ते म्हणत आश्रम-भजनावलीतील तुकारामाच्या एका अभगाचे सार ते लाक्षणिक रीत्या शिकवीत असे —

**पापाची वासना नको दाऊ डोळा । त्याहुनी आधळा बराच मी ॥**
**निंदेचे श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनी ठेवीं देवा ॥**
**अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहुनि मुका बराच मी ॥**

गाधीजीची अभिरुचि दाखवते की, जीवनाच्या खऱ्या कलेचे मर्म ते जाणत होते. कलेच्या नावाने सर्वत्र धिगाणा घालणारी विकला त्याना पसत नव्हती. शुद्ध सस्कारी जीवनातून समृद्धि आणि रसिकता याचा पूर्ण परिपोष त्याच्यात झाला होता व म्हणून या गरीब झोपडीचे आकर्षण जगातील थोर थोर लोकाना झाले होते. या सत्यनिष्ठ व अहिंसाभक्त कर्मयोग्याच्या वास्तव्यामुळें झोपडीला दिव्यत्व प्राप्त झाले होते! राजघराण्यातील मडळी, धनाढच व्यापारी, आतरराष्ट्रीय ख्यातीचे विद्वान्, देशोदेशीचे राजकारणी पुढारी व नामाकित वृत्तपत्राचे सपादक आणि बातमीदार, सर्वांनी या झोपडीचे दर्शन घेऊन तीत वास्तव्य करणाऱ्या दिव्य विभूतीचा सदेश ऐकला आहे. तरी सुद्धा मुख्यत्वे ही झोपडी गरीब, दलित, पतित व रोगी याची साउली बनलेली आहे येथेच राहून गाधीजीनी भारताच्या स्वातत्र्यासाठी करावयाच्या अतिम लढ्याकरिता तीव्र तपश्चर्या केली येथील शातीतूनच त्याना प्रेरणा मिळत असे. फार महत्त्वाचे निर्णय त्यानी येथेंच घेतले! झोपडीतील व झोपडीच्या भोवतालचे वातावरण गाधीजीच्या चैतन्यानें भरून राहिले आहे घट फुटल्यावर घटाकाश व महदाकाश ही एक झाली!!

● ●

# २ योग्याचा संसार

* निष्कंटकेऽपि न सुखं वसुधाधिपत्ये
कस्यापि राजतिलकस्य यदेष दोषः ।
विश्वेश्वरो भुजगराजविभूतिभूषो
हित्वा तपस्यति चिरं सकला विभूतिः ।।

तप म्हणजे मुख्यत इंद्रियदमन, असा अर्थ शास्त्रानी केला आहे. त्यासाठी अरण्यात किंवा एकातात राहिले पाहिजे अशी सक्ती नाही. गाधीजीची तपश्चर्या लोकातच चालू होती. जेव्हा एकाताची गरज भासे तेव्हा ते मौन घेत असत श्रीसमर्थाबद्दलचे उद्गार गाधीजीनाही लागू पडतात –

श्रीगुरुसमर्थ एकातीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनासि येती ।
सकळ प्रातींचा स्वामी परामर्श घेती । चिंता करिती विश्वाची ।।

सेगावला नतर सेवाग्राम हे नाव देण्यात आले. तेथे जाऊन राहण्याचा बेत गाधीजीनी केला तेव्हा आपण एकट्यानेच जाऊन राहावे असा त्याचा विचार होता पण ते तुरुगाबाहेर असताना छायेप्रमाणे त्याच्याजवळ अविनाभावाने वसणाऱ्या त्याच्या पत्नी कस्तुरबा त्याच्या अनुगामिनी झाल्या खेड्यात विविध प्रकारच्या सेवा करणाऱ्या योजना गाधीजीकडे चालून येऊ लागल्या तशी माणसेही गोळा होऊ लागली चरखा आल्याबरोबर त्याचा परिवारही आला! आरभी त्या खेड्यातील हवापाण्यापासून आजार उद्भवू लागले. त्यावर उपाय योजताना प्रथम दवाखाना व नतर रुग्णालय स्थापन झाले! मुलामाणसाना

* पृथ्वीचे शत्रुरहित राज्य प्राप्त करून देखील कोणाही महान् राजाला सुख मिळाले नाही, (म्हणून) प्रचड सर्प व भस्म हे ज्याचे अलकार तो विश्वेश्वर सर्व विभूतीचा त्याग करून चिरकाल तपश्चर्या करीत आहे.

पुष्टि मिळावी म्हणून गाई आल्या ! त्यामुळे गोशाळा उभारावी लागली. पुढें मूलोद्योगी शिक्षणाची योजना गांधीजींनी देशाला दिली. तिच्या अनुषगाने शिक्षणाचे मुख्य केंद्र सेवाग्रामच बनले. नई तालीम देणाऱ्या संस्थेचा पसारा पुढें फार वाढत गेला. ज्या प्रांतात काँग्रेसची मंत्रिमंडळे राज्यकारभार करीत होती, त्या प्रांतातून शेकडो शिक्षक नई तालीम घेण्यासाठी सेवाग्रामला पाठवण्यात येऊ लागले. शिवाय शेती, बागवानी, ग्रामोद्योग, यांचेही नाना प्रयोग होत गेले. कै. जमनालालजींनी आपली सारी जमीन गांधीजींना दान दिली व तिचे दानपत्रही करून टाकले !

जेथे पूर्वी शेतजमीन पसरली होती तेथे हळू हळू झोपड्या दिसू लागल्या. मूळ सेगाव खेड्याच्या शेजारी एक सुधारलेले दुसरे खेडे वसले. जमनालालजींची जमीन व्यापून त्याने आणखीही जमीन मिळविली. अर्थात् लोकसंख्याही वाढली हे सांगणे नकोच. नाना भाषा बोलणारे, विविध पेहेरवेषाचे स्त्रीपुरुष येऊन वसले. देशातील तसे परदेशातील लोक आवडीने येऊन सेवाग्रामात राहू लागले

गांधीजींच्या जीवनाचे उघडें पुस्तक लोकांसमोर पडले होते. समाजातील हलाखी दूर करण्यासाठी ही त्यांची तपश्चर्या होती. पुढाऱ्यांना स्वामी विवेकानंदांनी हांक दिली, "खरा भारत खेड्यातून पसरला आहे !" त्याच्या हाकेस प्रथम गांधीजींनीच साद दिला. देशाचा विकास करावयाचा असेल तर खेड्यांकडे प्रथम लक्ष दिले पाहिजे खेड्यांची जडता ही देशाची जडता आहे.

**दयेसाठीं केला उपाधि पसारा । जडजीवां तारा नावकथा —तुकाराम.**

जड जीवांचे तारण करण्यासाठी पोटच्या कळवळ्याने गांधीजी अज्ञात व दरिद्री अशा एका खेड्यात जाऊन राहिले. तेथें त्यांनी आपल्या आश्रमास सत्यअहिंसेची प्रयोगशाला बनविले. अस्पृश्यते-सारख्या रोगाला समूळ खणून काढण्यासाठी महाप्रयत्न केले. ज्याला जगात "Conscience of Humanity" (मानवतेची धर्मबुद्धि) म्हणून कीर्ति मिळाली होती, ज्याच्या पुरुषार्थाने ब्रिटिश साम्राज्य

कापू लागले होते, तो महापुरुष या खेड्यात राहून आदर्श ग्रामीण जीवनाचे धडे लोकाना शिकवीत होता दुर्दैवात सापडलेल्या राष्ट्राला मुक्त करण्यासाठी, जीवनकलेची संजीवनी प्राप्त व्हावी म्हणून गाधीजीनी अनेक प्रयोग केले.

सुवर्ण आणि परिमळ। हिरा आणि कोमळ।
योगी आणि प्रेमळ। हे दुर्लभ जी दातारा ।। – नामदेव.

गाधीजीची तपश्चर्या अशा प्रकारची होती दिवसेदिवस त्याच्यातील मानवतेची भावना उत्कर्ष पावत होती समोरच्या तसबिरीत कुटीराच्या पार्श्वभूमीवर हा एकाकी योगी पाहून असे वाटते –

नम्र झाला भूता। तेणे कोडिले अनता ।।
हे चि शूरत्वाचे अंग। हारी आणिला श्रीरग ।। –तुकाराम.

# ३ राष्ट्रमाता

मर्व माझी जोडी पाय तुझे ।

— तुकाराम

श्री कस्तुरबा स्वपतीच्या पायाना तूप चोळीत आहेत उभयता-चा विवाह झाला तेव्हा वधूवराचे वय केवळ वारा वर्षाचे होते त्यात-ही वा गाधीजीपेक्षा वयाने सहा महिन्यानी वडील हात्या पण आपले सारे जीवन त्यानी पतीच्या पावलावर पावले टाकण्यात कठले ! त्या पूर्वी निरक्षर होत्या, पण मोठ्या वयात गाधीजीनी त्याना गुजराती लिहिणे-वाचणे शिकविले इग्रजी व हिंदीभाषी समाजात उठतावसताना त्यानी त्या दोन्ही भाषा कामापुरत्या शिकून घेतल्या होत्या त्याना धार्मिक ग्रथ वाचण्याची आवड होती गाधीजींचे लिखाण ही त्या लक्ष-पूर्वक वाचीत असत त्या नेमाने सूत कातीत त्या जुन्या सस्कारात वाढल्या होत्या त्यामुळे पतीच्या शिकवणीवरुन अस्पृश्यता मनातून काढून टाकणे त्याना सुरुवातीस जड गले पण त्यानी निर्धाराने शिकवण आत्मसात् केली

त्याना पाच मुले झाली पहिले मूल जन्मल्यावरोवरच वारले ! पुढील चार पुत्र त्याच्या पश्चात्ही जगले सर्वांचे आईवर प्रेम होते थोरल्यान आपल्या पित्याची निंदा केली, व्यसने लावून घेतली, स्वत वेगळा राहू लागला तरी कस्तुरवावद्दल त्याच्या मनात शेवटपर्यंत प्रेमादर होता दक्षिण आफ्रिकेन कस्तुरवा यानी तुरुगवास सोसला वाहेर पडल्या तेव्हा त्या आसन्नमरण झाल्या होत्या पतीने अनन्य शुश्रूषा करून त्याना जगविले स्वदेशी आल्यावरही त्या पतीच्या सतत अनुगामिनी राहिल्या येथेही त्यानी तुरुगवास अनेकदा भोगला इग्रज सरकार त्याची एवढी कदर करी की, गाधीजी जेव्हा जेव्हा

तुरुंगात उपवास करीत, तेव्हा तेव्हा कस्तुरबाना – त्या तुरुंगात असल्या तरी – त्याचे सन्निध पाठवून देई.

सेवाग्रामच्या आश्रमात त्यानी सुरुवातीस फार अडचणी सोसल्या. आदिनिवासात गाधीजीनी आपला मुक्काम ठोकला होता. एका कोपऱ्यात महात्माजी राहात, दुसऱ्या कोपऱ्यात बा, तिसऱ्या कोपऱ्यात बादशाहखान (अबदुल गफ्फारखान) व चौथ्या कोपऱ्यात आश्रमातील अेक कार्यकर्ते मुन्नालाल – याप्रमाणे व्यवस्था होती बाना सकोच वाटू लागला. स्त्रीजातीच्या मर्यादामुळें त्याना काहीतरी बदिस्तपणा हवा होता पण गाधीजी त्याना स्वतत्र झोपडी किंवा खोली करून देण्यास कबूल होईनात ! शेवटी थोडासा आडोसा करून देण्यास राजी झाले व ओसरीतच दोन बाबू लावून तट्ट्याचा पडदा लावून टाकला व बाना "खोली" करून दिली कस्तुरबानी मानून घेतले तरी त्याना बरेच सोसावे लागत होते हा सर्व प्रकार पाहून जमनालालजीना दु ख झाले. त्यानी गाधीजीशी खूप चर्चा करून बासाठी स्वतत्र झोपडी बाधण्यासाठी त्याचेकडून मिनतवारीनें परवानगी मिळवली व स्वखर्चाने कस्तुरबाच्या सोईप्रमाणे स्वतत्र झोपडी बाधून दिली, जी 'बाकुटी' या नावाने आज ओळखली जाते या स्वतंत्र कुटीत सुद्धा बाना वारवार पाहुण्याना सोबतीस ठेवून घ्यावे लागे पण त्यानी कधी तक्रार केली नाही. गाधीजीच्या सान्निध्यात त्यानी पुष्कळ गुण शिकून घेतले त्यात गाधीजींच्या परिवाराची माता बनणे हे एक कर्तव्यही त्यानी सहजपणे बजावले.

इ० स० १९४२च्या सुमारास त्याची प्रकृति खूप खालावली होती. ता ५ ऑगस्ट १९४२ रोजी त्यानी गाधीजीबरोबर सेवाग्रामचा आश्रम सोडला तो अखेरचाच ! त्यानतर त्या पुन्हा इकडे आल्या नाहीत. ता. ९ ऑगस्ट १९४२ रोजी पहाटे गाधीजीना मुबईत अटक झाली व त्याना पुण्यास आगाखान महालात पाठवण्यात आले, त्यानतर काही तासानी कस्तुरबानाही अटक झाली. सरकारने त्याची रवानगी पतीकडेच केली. त्यामुळें त्याना जीवनाच्या अतापर्यंत पति-सान्निध्याचे भाग्य मिळाले. तेथें महादेवभाईंचे आकस्मिक अवसान

व गांधीजींचा एकवीस दिवसांचा उपवास हीं दोन महासंकटें त्यांना अति कष्टप्रद झाली ! त्यानंतर दीर्घ दुखणें येऊन त्यांनीं ता. २२ फेब्रुवारी १९४४ रोजी महाशिवरात्रीच्या पुण्यदिनीं पतीच्या अंकावर महानिद्रा केली !!

त्या थोर साध्वीच्या स्मरणार्थ देशानें स्वयस्फूर्तीने सव्वाकोट रुपयांचा निधि जमवून गांधीजींना अर्पण केला. कस्तुरबा गांधी राष्ट्रीय स्मारक ट्रस्ट या नांवानें त्याचें स्मारक त्या निधीतून करण्यांत आलें.



# ४ खेड्यांतील दुःखें

दु:ख दुसऱ्याचें जाणावें। ऐकून तरी वांटून घ्यावें ।।

— दासबोध

जेथें सेवाग्रामचा आश्रम उभारण्यात आला, ती जागा पूर्वी मोकळी व शेताची होती. सेगाव खेड्याला लागूनच ही शेतजमीन होती. सर्वत्र माळरानासारखी दिसणारी। झाडेंही नव्हती। पाण्याची सोय नव्हती। गांधीजींनी खेड्याचा आदर्श मनात बाळगून आपला आश्रम वसविला तरी त्याचा आदर्श ते कंगाल सेगाव खचीत नव्हते। आश्रम प्रथम नकाशावर तयार झाला, नंतर मूर्तस्वरूपात आला. त्याला आकारबद्ध करण्यात श्री. रामदासभाई गुलाटी सारख्या अनुभवी व भक्त-साधक एंजिनीयरची एकाग्र सेवा अर्पण झाली होती। विहिरी बांधण्यात आल्या, झाडें लावण्यात आलीं. सडकेच्या दोहों बाजूस लांबवर आज जी वृक्षांची ओळ दिसते ती गांधीजींच्याच हयातीत लावण्यात आली होती. गांधीजी व कस्तुरबा यांच्यासाठी स्वतंत्र झोपड्यांची सोय झाल्यावर आदिनिवासचा उपयोग इतर कार्यकर्ते व पाहुणे यासाठी होऊं लागला. स्वयंपाकासाठी स्वतंत्र झोपडी बांधण्यात आली. तरी जेवणासाठी पंगत आदिनिवासच्या पडवींतच बसत असे।

शेतात आश्रम बांधून वस्ती करण्यात आल्यावर प्रथम मोठा उपद्रव मच्छर व हिंवताप यांचा सुरू झाला. लागोपाठ विहिरींच्या पाण्यातून विषमज्वाराचा उद्‌भव होऊं लागला. आश्रमात पहिले सेवाकार्य आजाऱ्याची सेवा व उपचार हेंच होऊन बसले. गांधीजींना पूर्ववयापासूनच रुग्णशुश्रूषेची आवड होती. जसजसे त्यांचे जीवन विशाल व भव्य होत गेलें तसतशा त्यांच्यातील कोमलता व वात्सल्य या वृत्ति वाढत गेल्या. आश्रमातील अनेक व्यक्तींच्या आजारात

त्यानी जातीने त्याची सेवा केली रुग्णाना बस्ति (एनिमा) देणे, स्पज करणे, औषध देणे, रात्री झोपेतून उठून त्याची विचारपूस करणे व औषध देणे या सर्व गोष्टी स्वत करून त्यानी आश्रमवासियाना रुग्णशुश्रूषेचे धडे दिले व त्या कार्यासाठी तयार केले

खेड्यातील लोकाचेही ते वैद्य बनले होते गाधीजीचा निसर्गोपचारावर भरवसा होता सूर्यप्रकाश, माती व पाणी याच्याच साहाय्याने रोग बरे होतात, हा त्याचा मूलमत्र होता ते नेहमी जवळ तीन साधने ठेवीत एरडेल, सोडाबायकार्ब व बस्ति रुग्णाना त्याच्याच द्वारा उपचार करीत खेड्यातील आजारी माणसे रोज सकाळी आश्रमात येऊन आपल्या आजाराची कहाणी गाधीजीना सागत तेही सर्वांशी बोलून-मिसळून त्याना योग्य ते उपाय सागत व पुन्हा आजारी पडू नये म्हणून नाना प्रकारच्या जीवनविषयक सूचना देत गरीबाना परवडतील असेच उपचार ते सागत

पाण्यातील जतूतून रोग बळावू नयेत म्हणून विहिरीचे पाणी शुद्ध करण्याचा प्रयत्न त्यानी चालविला विहिरीच्या पाण्यात मधून मधून परमॅग्नेट ऑफ् पोटॅश टाकले जाई पिण्याचे पाणी उकळून घ्यावे असा नियम केला डास होऊ नयत म्हणून सर्वत्र साडपाणी जमिनीत मुरवून टाकण्याची व्यवस्था झाली कोठेही डबकी साचू नयेत, राहाण्याच्या जागा, अगण, सडास व मुत्र्या स्वच्छ ठेवाव्या, यासबधी नियम करण्यात आले तरी शेकडो वर्षे साचलेली घाण व अस्वच्छता दूर करण्यास काही वर्षांचा काळ लागलाच

आश्रम रानात असल्यामुळें सुरुवातीस विंचू व साप याचे भय असे. सापाना मारू नये, पकडून दूर नेऊन सोडून द्यावे असा प्रघात होता या प्रकरणास जोडून असलेल्या पहिल्या चित्रात गाधीजीचे एक चिटणीस प्यारेलाल याना विंचू चावल्यामुळें उपचारापूर्वी चावलेल्या जागेची पहाणी गाधीजी करीत आहेत व प्यारेलालच्या भगिनी सुशीला नायर या जवळ उभ्या राहून दाखवीत आहेत असे दृश्य आहे

सुशीलाबहून या सरकारी मेडिकल कॉलेजच्या पदवीधर आहेत. प्यारेलालजींसाठी त्या ज्या आश्रमात येऊन राहिल्या, त्या पुढें गांधीजींच्या अवसानापर्यंत त्यांचेचजवळ होत्या. त्या आल्यामुळें गांधीजींचा प्राकृतिक गावठी दवाखाना हळू हळू बदलत गेला व त्या-वर आधुनिक पाश्चात्य वैद्यकाची पुटें चढू लागली. आजमितीस तो सेवाग्राम आश्रमापासून काही अंतरावर बिर्लाजींनी बांधलेल्या व नंतर वाढवलेल्या आधुनिक पद्धतीच्या इमारतीत आलोपाथिक स्वरूपात ऐश्वर्य मिरवीत राहिलेला दिसतो !

दुसऱ्या फोटोत पोलंडचे भारतानंद आजारी असताना गांधीजी त्यांची विचारपूस करीत आहेत.

• •

# ५ रोप वाढलें

वनें उपवनें पुष्पवाटिका । तापस्यांच्या पर्णकुटिका ।
ऐसी पूजा जगन्नायका । यथासांग समर्पावी ।।

— दासबोध ।

भारत व अरण्यें याचा पूर्वापार जिव्हाळ्याचा सबध आहे. भारताची प्राचीन काव्ये रामायण व महाभारत ही अरण्याच्या वर्णनानी खचून भरली आहेत. ग्रामीण किंवा नागरी प्रदेशापेक्षा अरण्याचा विस्तार तेव्हा अफाट होता. चार आश्रमापैकी ब्रह्मचर्य व वानप्रस्थ हे दोन्ही आश्रम अरण्याच्याच आश्रयानें राहात असत. भारतात पर्वत सर्वत्र पसरले आहेत. अरण्याना त्याचा मोठाच आधार असे

परंतु अर्वाचीन कालात मनुष्यवस्ती वाढू लागली, यत्रयुगानें आपले पख (कारखाने) पसरले, माणसेही यंत्राच्या सगतीनें यंत्रे बनू लागली. कारखान्याभोवती गावें व शहरे वसू लागली. त्यामुळें अरण्याचा सहार होऊं लागला वस्तीशेजारची झाडे सरपणासाठी तोडण्यात येऊ लागली. हळूहळू जमिनीची धूप जाऊं लागली. शेंकडो मैल प्रदेश ओसाड व रखरखीत झाले राजस्थान व कच्छ या प्रदेशात वाळूची रणे पसरली. झाडें नसल्यामुळें पाऊसही त्या आतप-दग्ध भूमीवर वर्षाव करीनासा झाला !

इ० स० १९३७ त देशामध्ये विविध प्रातातून काँग्रेसची मत्रि-मडळें अधिकारारूढ झाली. त्यानतर दरवर्षी पावसाळ्याच्या आरंभी वनमहोत्सवाच्या नावानें नवीन झाडें लावण्याचा उपक्रम सुरु झाला सेवाग्रामच्या भूमीवर गाधीजीनी हा उपक्रम तत्पूर्वीच सुरु केला होता. बापूकुटीच्या दर्शनीभागास जो भव्य पिंपळाचा वृक्ष आहे तो त्याच्या हस्ते लावला गेलेला पहिलाच वृक्ष होय ! वृक्ष नसले तर आश्रमास शोभा कशी यावी ? शिवाय गाधीजीना वृक्षाचे भारी प्रेम !

दत्ताने चोवीस गुरु केले तसे गांधीजींचेही अनेक होते मर्कटत्रयीची कथा मागें आलीच आहे वृक्ष हाही त्यांचा गुरुच ! एरवी आश्रम-भजनावलीत त्यांनी शिफारस केलेले एकुलते एक गीत कसे प्रविष्ट झाले असते ?

वृक्षन से मत ले, मन तू वृक्षन से मत ले ।
काटे वाको क्रोध न करहीं, सिंचत न करहिं नेह ।। वृक्षन० ।।
धूप सहत अपने सिर ऊपर, और को छांह करेत ।
जो वाहीको पथर चलावे, ताहीको फल देत ।। वृक्षन० ।।
धन्य धन्य ये परउपकारी, वृथा मनुज की देह ।
सूरदास प्रभु कहँ लगि बरनौं, हरिजनकी मत ले ।। वृक्षन० ।।

गांधीजींच्या दृष्टीनें अनासक्त सत्याग्रहीचा आदर्श वृक्षमाध्यात प्रत्यक्ष झाला आहे वरील गीतात वृक्षाच्या गुणांचे वर्णन अपूर्ण आहे वृक्षामुळें चित्रविचित्र पक्षीसृष्टि जवळ येते व आपला मधुर कलरव आणि गोड गाणी, विविध क्रीडा व अकल कला यांनी मानवाचे जीवन समृद्ध करते ! गांधीजींच्या पश्चात् वृक्ष गगनव्यापी झाल्यावर हा सारा चमत्कार आश्रमवासियांच्या अनुभवास येऊ लागला ! गांधीजींनी शेतजमीन वस्तीसाठी वापरली तरी शेती चालूच राहिली गाईबैलांच्या संगतीनें जमिनीला संस्कार मिळत गेले व झोपड्यांनी आक्रमण केल्यामुळें झालेले नुकसान वृक्षांनी भरून काढले !

सेवाग्रामच्या आश्रमात व त्याच्या परिसरात वृक्षाचा कुटुंब-विस्तार भरपूर झाला आहे तो पहाण्यास गांधीजी नाहीत त्यांनी मात्र रोपटी लावली ! ! ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः

• •

# ६ साक्षेपी नेता

ऐसा पुरुष धारणेचा । तोचि आधार बहुतांचा ।
दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ।।

-दासबोध

गांधीजी खेड्यात आश्रम स्थापून राहिले तरी देशातील राजकीय परिस्थिति त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती त्यांना वारंवार प्रवास करावा लागे. मुंबईच्या कांग्रेस-अधिवेशनानंतर त्यांनी कांग्रेसचें सभासदत्व सोडून दिले होते तरी त्या संस्थेने त्यांना आपले नेते मानले होतें. देशाला स्वातंत्र्य मिळवून देणारा निधडा संग्रामवीर म्हणून हिंदी जनता त्यांचेकडे पहात होती. ते खेड्यात राहावयास गेल्यावर कांग्रेसची अधिवेशनेंही खेड्यात भरली जाऊं लागली. डिसेंबर १९३६ मध्यें कांग्रेस-अधिवेशन महाराष्ट्रातील फैजपूर खेड्यात भरले. त्यास गांधीजी हजर होते नंतर १९३५च्या नवीन सुधारलेल्या कायद्याप्रमाणे देशभर निरनिराळ्या प्रांतांतून निवडणुका झाल्या सुरुवातीस सात व नंतर आठ प्रांतांतून कांग्रेसची मंत्रिमंडळें अधिकारारूढ झाली. पंजाब, बंगाल व सिंधमध्यें मुस्लीमलीगची मंत्रिमंडळें राज्य करू लागली घातपाती कृत्याच्या आरोपावरून तुरुंगात चौकशीशिवाय खितपत पडलेल्या शेकडो राजकीय कैद्यांच्या मुक्ततेसाठी गांधीजींना धाव घ्यावी लागली. हरिजनांना मंदिरे खुली व्हावी म्हणून त्यांनी दूर दक्षिणेत दौरे केले व ते सारे सफल झाले। गांधी सेवा संघाचे वार्षिक संमेलन दर वर्षी राष्ट्रीय आठवड्यात (६ एप्रिल ते १३ एप्रिल) देशातील भिन्न भिन्न प्रांतांतील एखाद्या विधायक कार्यकेन्द्र असलेल्या खेड्यात भरत असे त्यास हजर राहून ते कार्यकर्त्यांस मार्गदर्शन करीत. राजकीय नेतृत्व व विधायक सेवाकार्याची संघटना या दोन्ही शक्ति झपाट्यानें वापरतां वापरतां त्यांचे जराजर्जर शरीर खंगत गेले देशव्यापी चळवळी चालवतांना सुरुवातीस

अपयश यावयाचेच. विषाचे भरपूर प्याले त्याना प्यावे लागत. त्यांचा परिणाम म्हणा अगर शरीराची मर्यादा म्हणा, त्याना रक्तदावाचा विकार लागू झाला. त्यामुळे वर्धा, नन्दी टेकडी (मैसूरमध्ये) व जुहू या ठिकाणी जाऊन त्याना मधून मधून सक्तीची विश्रांति घ्यावी लागली !

फैजपूर कांग्रेसचे अध्यक्ष पडित जवाहरलाल नेहरू होते. त्यानंतरचे कांग्रेस-अधिवेशन १९३८ च्या फेब्रुवारीत गुजरातेत हरिपुरा येथें भरले. अधिवेशन खेड्यांत भरले होते पण त्याचा थाटमाट व वैभव शहराला लाजवतील अशी होती ! कांग्रेस मंत्रिमंडळें अधिकारारूढ झाल्यानंतरचें ते पहिलेच अधिवेशन होते, इतके सांगितले म्हणजे पुरे. त्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री सुभाषचंद्र बोस हे होते.

समोर दिलेला फोटो हा फेब्रुवारी १९३८ मधील आहे. जवाहरलालजी सेवाग्रामला आले होते व गाधीजीशी सल्लामसलत करीत होते. जवळच राजकुमारी अमृतकौर उभ्या आहेत. पंजाबमधील तत्कालीन कपुरथला संस्थानच्या राजघराण्यात त्याचा जन्म झाला. वडिलानी ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता त्यामुळें राजगादीवरील त्याचा हक्क गेला. राजकुमारीनी दहा वर्षे इंग्लडमध्ये राहून शिक्षण घेतले. या देशातील अखिल भारतीय महिला परिषदेच्या प्रमुख नेत्यांपैकी त्या एक होत्या. श्रीमंत घराण्यातील ही स्त्री गाधीजीच्या आश्रमात कित्येक वर्षे राहिली व त्याची कामें करूं लागली हे विशेष होय !

• •

# ७ दिग्विजयाचें मूल्य

**आनंदा आनंद तो । प्रबोधा प्रबोध तो गे बाई ।।**

*– ज्ञानदेव*

इसवी सनाचे १९३८ साल फार गडबडीचे गेले हरिपुरा काँग्रेस अधिवेशन सपल्यावर राजकीय कैद्याचा प्रश्न धसास लावावा लागला. नंतर गाधी-सेवा-संघाचे वार्षिक समेलन उत्कलमध्ये डेलाग येथें भरले होते त्यास गाधीजी आठवडाभर हजर राहिले राष्ट्राच्या अतर्गत ज्या समस्या वेळोवेळी उभ्या राहात, त्याना तोड देण्यासाठी खूप विचार व प्रचार करावा लागत असे एप्रिलमध्यें त्यानी जिनाची भेट घेऊन बोलणी केली. तेथून ते वायव्य सरहद्दीवरील पठाणाच्या प्रातास भेट देण्यास गेले. काँग्रेस मंत्रिमडळे असलेल्या प्रातात गुतागुतीची परिस्थिति निर्माण होई तोवरही तोडगा त्यानाच काढावा लागे. जुलैमध्ये मध्यप्रातात डॉ. खरे प्रकरण उपस्थित झाले ! ते निस्तरताना गाधीजीना फार क्लेश झाले. त्याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर फारच झाला त्यानी बेमुदत मौन घेतले ! तरी चीनहून मुद्दाम त्याच्या भेटीस आलेले प्रोफेसर ताव् त्याना सोडीनात. चीनवर जपानने चालू ठेवलेल्या आक्रमणाबाबत त्याना गाधीजीचे मार्गदर्शन हवे होते सत्तास्वीकाराचे दुष्परिणाम देशात जाणवू लागले होते. हिंसेचे प्रकार वाढू लागले होते ज्या हरिजनासाठी गाधीजीनी आपले प्राण पणास लावले त्याचेचकडून गाधीजीवर गभीर आघात झाला ! "मत्रिमडळात हरिजन मत्री घेण्यात आला नाही, तेव्हा तो नेमला जावा ही आमची मागणी आहे. ती पुरी होईपर्यंत आम्ही तुमच्या आश्रमात धरणे धरून बसू," असे आह्वान देणारे एक हरिजन शिष्टमंडळ सेवाग्रामच्या आश्रमात येऊन दाखल झाले ! ही ऑगस्ट अखेरची घटना होती गाधीजीनी त्याना खूप समजावले पण ते ऐकेनात. तेव्हा त्याच्या मागणीप्रमाणे त्याना कस्तुरबाकुटीत

राहाण्यास गांधीजींनी संमति दिली व फार ममतेनें वागवले! ऑक्टोबरमध्ये गांधीजी पुन्हा सरहद्द प्रांतात दौऱ्यावर गेले. हा दौरा फार भव्य व जिव्हाळ्याचा झाला अबदुल गफ्फारखान ऊर्फ बादशाह-खान यांचे नैतिक सामर्थ्य, संघटनाचातुर्य व लोकप्रियता यांचे प्रत्यक्ष दर्शन गांधीजींना या दौऱ्यात घडले. पठाणही "मलंग" बाबाच्या (गांधीजींना त्यांनी दिलेले नाव) दर्शनानें प्रमुदित झाले!

आंतरराष्ट्रीय संबंधही वाढत होते. अमेरिकेतील तिरस्कृत शिद्दी जमात, युरोपातील ख्रिस्ती लोकांकडून अपमानित झालेली व जर्मनीत हिटलरच्या जुलमाच्या चरकातून पिळून निघालेली ज्यू जमात, तसेच इंग्लंड अमेरिकेच्या मदतीनें ज्यू लोकांनी पॅलेस्टाइनमधून घालवून दिलेले अरब, इत्यादि दलित व शोषित जमातींच्या प्रतिनिधींकडून गांधीजींना वारंवार विचारणा होई आणि तेही त्यांना मार्गदर्शन करीत; आत्मगौरव वाढवणारें व प्रतिपक्षाचे हृदय-परिवर्तन करणारे अमोघ शस्त्र अहिंसामूलक सत्याग्रह याची शिफारस करीत; त्यांना आपले मौलिक विचार समजावून सांगत.

इ. स. १९३८ च्या शेवटल्या महिन्यात त्यांच्या भेटीस बरेच ख्रिस्ती नेते येऊन गेले भारत देशात ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या अनेक संस्था होत्या. त्यांचेतर्फे विशेषेंकरून मागासलेल्या वर्गांतील व अस्पृश्य जमातींतील लोकांना ख्रिस्ती करून घेण्याचे प्रयत्न पद्धतशीर-पणे चालू असत गांधीजींना हे पसंत नव्हते. त्यावरून व गांधीजींची विचारसरणी जाणून घेऊ इच्छिणाऱ्या मिशनऱ्यांच्या समाधानासाठी गांधीजींनी त्यांचेशी पुष्कळ चर्चा केली व आंतरराष्ट्रीय परिस्थिती-बाबत आपले विचार सांगितले. युरोपमधील शांततावाद्यांची भूमिका व आपली भूमिका यांतील भेद विशद करून सांगितला. त्यानंतर जपानी लोकसभेचे एक सदस्य श्री तागाजोगा भेटीस आले. जपानमध्ये "आशियाई लोकांसाठी आशिया" या उद्दिष्टाप्रीत्यर्थ एक पक्ष स्थापन झाला होता. त्यासाठी ते गांधीजींचा संदेश मागू लागले. गांधीजींनी त्या उद्दिष्टाला कूपमंडूकाचा सिद्धान्त म्हणून नाव ठेवले!

या महिन्याच्या शेवटी शेवटी सेवाग्रामला भेटी देणाऱ्या लोकांची गर्दी फारच वाढली होती. गांधीजींना कितीही थकवा वाटला, किंवा त्यांच्यावर कामाचा कितीही ताण पडला तरी त्यांची प्रसन्नता कधीच लुप्त होत नसे सोबतचा फोटो त्यांचे अनेक वर्षांचे मित्र दीनबंधु अ‍ॅण्ड्रूज यांनी सेवाग्रामला १९३८ च्या डिसेंबरात भेट दिली तेव्हांचा आहे. अ‍ॅण्ड्रूज हे युवावस्थेत इंग्रज धर्मोपदेशक होते. पण त्यांच्या शुद्ध वृत्तीला मिशनऱ्यांचे धोरण पसंत पडले नाही. म्हणून त्यांनी ती संघटना सोडली व ते शांतिनिकेतनमध्ये जाऊन राहिले. गांधीजींनी दक्षिण आफ्रिकेत चळवळ सुरू केली तेव्हा ते व श्री पियरसन त्यांच्या मदतीसाठी गेले होते. तेव्हापासून गांधीजींशी त्यांचा स्नेह जमला व तो शेवटपर्यंत टिकला गांधीजींनी १९२२ मध्यें अखिल भारतीय स्वातंत्र्याची मोहीम सुरु करण्याचे ठरविले तेव्हा निर्वाणीचा खलिता देऊन अ‍ॅण्ड्रूज यांनाच दिल्लीस व्हाइसरॉयकडे पाठवले होतें ! अ‍ॅण्ड्रूज यांचे मन एखाद्या बालकाप्रमाणे निष्पाप व सरळ होते. गांधीजींशी त्यांचे मतभेद झाले तरी स्नेहात कधीच फरक पडला नाही. फोटोत गांधीजी त्यांचेशी हास्यविनोद करीत असलेले दिसत आहेत.

बहुतांचें समाधान राखावें। बहुतांस मानेल तें बोलावें ।।

ही समर्थांची कला गांधीजींमध्ये पूर्ण उतरली होती. कोरड्या राजकारणाची चर्चा चालू असतां ते आपल्या सहृदय विनोदाने रस निर्माण करीत; क्रोधाविष्टांना शांत करीत; लोकांची हृदयें उकलीत; दुःखी चित्तावर आपल्या गोड वाणीने सहानुभूतीचे सिंचन करीत !

दुसऱ्या चित्रात अमेरिकेच्या यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिएशनच्या निग्रो शाखेच्या चिटणीस कु. सी. स्मिथ यांचेशी गांधीजी हस्तांदोलन करीत आहेत.

धन्य ते संसारीं। दयावंत जे अंतरीं ।।
येथें उपकारासाठीं। आले घर ज्यां वैकुंठीं ।।
लटिकें वचन। नाहीं, देहीं उदासीन ।।
मधुरवाणी ओठीं। तुका म्हणे वाव पोटीं ।।

• •

# ८ धर्माचा साक्षात्कार

प्रभो शरण आलियावरि न व्हा कधीं वाकडे ।
म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवाकडे ।।

– केकावली

आश्रमाच्या बाहेर देशात जागोजाग काम करणारे गांधीजींचे हजारो अनुयायी होते त्यापैकी एक परचुरे शास्त्री हे होते ते संस्कृतचे पट्टीचे विद्वान् होते, संस्कृतमध्ये बोलत असत अशा या विद्वान् कार्यकर्त्याला महारोगाने ग्रासले !

येरवडा तुरुगात ते व महादेवभाई एकत्र असताना तेथें परचुरे शास्त्र्याना कुष्ठरोग लागू झाल्याचे दृष्टोत्पत्तीस आले सन १९३० च्या चळवळीतील ही घटना आहे. सुटल्यावर ते साबरमती येथील सत्याग्रहाश्रमात दाखल झाले. रोगाची सुरुवात होती, त्यामुळे गांधीजीच्या समतीने त्याना तेथें आश्रय देण्यात आला. अर्थात् त्याना अलग वस्तीत ठेवण्यात आले होते. तेथें राहून ते अध्ययन, अध्यापन, वाचन व सूत्रयज्ञ करीत असत सन १९३३ साली आश्रम विसर्जन झाल्यावर ते महाराष्ट्रात परत आले, पण दिवसेदिवस रोगाने उग्ररूप धारण केले. त्याना कोणी जवळ करीना. स्वजन व स्वजाति याचेकडून बहिष्कृत होण्याची पाळी त्याचेवर आली काही काल त्यानी यातना सोसल्या. पण पुढें असह्य होऊन त्यानी मरणान्त उपवास सुरू केला तरी शेवटपर्यंत नेट धरणे त्याना शक्य झाले नाही. मग काय करणार ? समाजाकडून उपेक्षित व दुर्लक्षित हा मानवप्राणी जगण्यासाठी व आश्रयासाठी धडपडत असता गांधीजींनी सेगावला आश्रम स्थापल्याचे त्याना कळले. परचुऱ्याच्या मनानें गांधीजीच्या चरणाचा घ्यास घेतला !

आडलिया जना होसी साहकारी । आंधळिया करीं काठी तूंचि ।।
आडले गांजले पडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ।।

रजल्यागाजलेल्याचा आपगिता त्याना एकच दिसला तेव्हा ते धावत सेवाग्रामला आले आले खरे पण आश्रमात प्रवेश करण्याची त्याची हिंमत झाली नाही आपले विद्रूप तोड घेऊन कोठे लोकासमोर जावे, असे त्याना वाटले ! पुढे गाधीजीची व त्याची आश्रमाच्या फाटकाजवळ सडकेवर गाठ पडली जमिनीवर बसल्या बसल्या हात जोडून त्यानी आपल्या नेत्याची आळवणी केली – "मला आपल्या सान्निध्यात मरावयाचे आहे मला काही नको मी झाडाखाली राहीन रोज दोन भाकऱ्या मिळाव्या, आणखी काही नको जिवत असेपर्यंत आपले सान्निध्य मिळावे, एवढीच इच्छा !' गाधीजी विचारात पडले आश्रमात तर चहू दिशाकडून माणसे गोळा झाली होती – स्त्रिया, मुले व पुरुष ! या महारोग्याला जवळ केल्याने आश्रमातील लोकाच्या आरोग्यास उपसर्ग पोचला तर कसे ? त्यामुळे पहिल्या भेटीत त्यानी शास्त्रीबुवाना समति दिली नाही शास्त्रीबुवा तेथेच झाडाखाली रात्रभर पडून राहिले

रात्री गाधीजीच्या मनात विचार येऊ लागले "मी न बोलवता हा रोगी येथें येऊन ठेपला आहे हा माझा जुना सहकारी आहे याला रोग झाला म्हणून मी याला कसे अव्हेरावे ? माझ्या नातजावयाला क्षय झाला आहे तरी त्याला आश्रमात ठेवून घेतलेच की नाही ? खुद्द बा त्याची सेवा करते वालजीभाई देसाई आजारी आहेत, त्यानाही ठेवून घेतले आहे मग परचुऱ्यानाच का नको ? माझी कसोटी करण्यासाठीच ईश्वरानें त्याना येथें पाठवले नसेल ? मग माझा धर्म कोणता ? त्याना येथें ठेवून घेणे हाच !"

झाले ! त्यानी निर्णय घेतला व दुसऱ्या दिवशी परचुरे शास्त्रीना भेटून त्याना अभय दिले आपल्या कुटीच्या पश्चिमेस सडकेजवळ त्यानी एक माडव बाधवला व तेथें त्याना ठेवले हळूहळू माडवाची कुटी बनली व शास्त्रीजी तेथें आरामपूर्वक राहू लागले

सुरवातीच्या चित्रात गाधीजी व शास्त्रीबुवा याची सडकेवरील पहिली भेट दिसत आहे

# ९ करुण आणि भव्य !

ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ।।
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ।।

— तुकाराम

गाधीजीनी परचुरेशास्त्र्यासाठी माडव बाधविला तो आश्रमातील वस्तीतच व सडकेच्या जवळ होता सडकेवर रहदारी चाले शास्त्रीबुवाचे उठणे-बसणे, खाणे-पिणे, शौच-बहिर्विधि याची तेथेंच सोय केली होती व सेवेस आळीपाळीने एखाद्या कार्यकर्त्याची नेमणूक होई. काही विचारवंत लोकाना त्यात धोका दिसला व त्यानी गाधीजीना सूचना केली की, इतक्या वस्तीत व रहदारीजवळ कुष्ठरोग्याला ठेवणे योग्य नव्हे त्याची सोय एकीकडे, वस्तीपासून दूर केली जावी गाधीजीना ते पटले व त्यानी गाधी-कुटीच्या पूर्वेकडील कुपणाजवळ, थोडया अतरावर एक कुटी बाधवली व तेथें शास्त्रीबुवाना ठेवले ते स्वत रोज त्याच्या समाचारास जात व आहार आदीचे नियम त्याना सागत काही दिवसानी शास्त्रीबुवाचे शरीर फारच बिघडले व अगावर फोड उठून ते फुटून पू गळू लागला. तेव्हा त्याना स्वत लाच स्वत ची किळस येऊन त्यानी मरणान्त प्रायोपवेशन करण्याचे ठरवले व गाधीजींची परवानगी मागितली गाधीजींनी ती दिली पण जवळच्या कार्यकर्त्याना सूचना केली की, शास्त्रीबुवाचे अवसान सुटले तर त्याना पुन्हा अन्नसेवन करू द्यावे उपवास सात दिवस चालला. नतर महादेवभाईंनी गाधीजीना कळवले की, "शास्त्रीजीचा निर्धार ढामळल्याचे दिसते " लगेच गाधीजींनी त्याना पुन्हा अन्न देण्यास सुरुवात केली नतर ते कधी कधी स्वहस्ते शास्त्रीबुवाना मालिश करू लागले व अन्नयोजना विचारपूर्वक करू लागले. उपवास, योग्य व नियमित आहार आणि महात्म्याची शुश्रूषा या तीनही कारणामुळे शास्त्रीबुवाची प्रकृति सुधारत गेली त्याचे शरीरावरील व्रण भरुन

आले व कांति सतेज दिसू लागली ! या धर्मकृत्याचा परिणाम एवढा झाला की, कुष्ठरोगाबद्दल हिंदुसमाजास घृणा वाटत असे ती कमी झाली. रोग लपवून ठेवण्याच्या वृत्तीला पायबंद बसला व या देशात पूर्वी ख्रिस्ती मिशनरीच काय ते कुष्ठरोग्यासाठी रुग्णालयें बांधून त्यांची सेवा करीत, त्या ऐवजी यानंतर हिंदुसमाजातूनही सेवक निर्माण होऊं लागले व कुष्ठरोग्यासाठी रुग्णालयें स्थापन होऊं लागली. पहिले रुग्णालय वर्ध्यापासून थोड्या अंतरावर श्री मनोहर दिवाण यांनी स्थापले. ते आजही दत्तपूर (कुष्ठधाम) या नावानें प्रसिद्ध असून त्याचा विस्तार झाला आहे. गांधीजींनी दोन वर्षांनंतर परचुरेशास्त्र्यांना या दत्तपूरच्या रुग्णालयात पाठवून दिले ! तेथेंच ते शेवटपर्यंत राहिले !

भगवत्सेवेचा हा कार्यक्रम गांधीजींनी यानंतर आपल्या अष्टादश प्रकारच्या रचनात्मक कार्यक्रमात प्रविष्ट केला. त्याचा प्रचारही खूप केला. निरनिराळ्या प्रांतातील सरकारांनी आपापल्या राज्यातून कुष्ठरोग्यासाठी रुग्णालयें स्थापली व त्या महान् सेवाकार्यासाठी अखिल भारतीय स्वरूपाची एक समितिही स्थापन झाली. आजमितीस या देशात सरकारी व बिनसरकारी मिळून कुष्ठरोग्यासाठी ३०० ते ४००च्या दरम्यान रुग्णालयें आहेत !

समोरच्या चित्रात गांधीजी शास्त्रीबुवांना मालिश करण्यासाठी सज्ज झालेले दिसत आहेत.

• •

# १० अध्ययनशीलतेचें हार्द

जो एकान्तासी तत्पर । आधीं करी पाठांतर ।
अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भीचे ।।

— दासबोध

समोरच्या तसबिरीत गाधीजी आपल्या कुटीत बसून लेखन करीत आहेत पलीकडे राजकुमारी अमृत कौर या पत्रव्यवहारात त्याना मदत करीत आहेत गाधीजीचा पत्रव्यवहार वाढता होता जगातील भिन्न भिन्न देशातून त्याना पत्रे येत ती सर्व वाचून त्याना उत्तरे देणे त्याच्या एकटयाच्या शक्तीबाहेरचे होते म्हणून त्यानी मन्त्रिमडळ मदतीस घेतले होते महादेवभाई देसाई हे त्याचे मुख्य मत्री होते, त्याचे मदतीस प्यारेलाल व राजकुमारी असत वेळप्रसंगी आणखीही व्यक्ति मदतीस घेतल्या जात. एखाद्या लहान मुलाने पत्र पाठवले तरी त्याला योग्य उत्तर देण्याची गाधीजीची परिपाठी होती व पत्राच्या योग्यतेप्रमाणे सविस्तर अगर सक्षेपात उत्तर लिहिण्यात त्याचा हातखडा होता

श्रीमतीच्या वातावरणात राजकुमारीचे पूर्वायुष्य गेले होते नामदार गोखले याचेशी राजकुमारीचा परिचय होता गोखल्यानीच त्याना गाधीजीची ओळख करून दिली, असे त्यानी प्रस्तुत लेखिकेला एकदा सागितले होते ओळख झाल्यावर गाधीजी त्याना कामे सागत गेले व त्यातून ओढ निर्माण झाली शेवटी त्या सेवाग्रामला येऊन राहिल्या राहावयास त्याना स्वतत्र कुटी नव्हती, आश्रमाच्या स्वयपाकघरात जें अन्न शिजविले जाई, तेच त्या खात । त्याचे शरीरही दणकट नव्हते. खादी नेसणे, सूत कातणे, सामुदायिक प्रार्थनेस नियमित हजर राहाणे व गाधीजीना त्याच्या कामात मदत करणे, अशा प्रकारे त्यानी साधना आरभिली सायप्रार्थनेंत तुलसीरामायण गायिले जाई, त्यात त्या भाग घेत वालजीभाई देसाई आजारी

असल्यामुळे गाधीजीनी त्याना सेवाग्रामच्या आश्रमात ठेवून घेतले होते. त्याना रोज मालिश करण्यावद्दल गाधीजीनी राजकुमारीना सुचविले. त्यानी तें लगेच अमलात आणले. गाधीजीनी आपल्या अपार प्रेमशक्तीच्या वळावर नाना योग्यतेची माणसे स्वत कडे आकर्षून घेतली व त्याना समाधान देऊन त्याचा साभाळ केला !

सत्याच्या साक्षात्कारासाठी गाधीजीनी जीवनभर प्रचड साधना केली पण तीसाठी त्यानी विजनवास पत्करला नाही लोकात राहूनही जरूर तर एकान्त साधण्याची युक्ति त्याना अवगत होती. त्याचे वाचन अफाट होते. अर्थात् वाचनाचे विषय स्वतन होते 'अन्न' या विषयावर आपण जितकी पुस्तके वाचली तितकी कोणीही वाचली नसतील, असे एकदा ते या लेखिकेच्या समोर म्हणाल्याचे आठवते. त्याची एकाग्रताही विलक्षण होती. विचार-परिप्लुत मोठेमोठे ग्रथ ते झपाट्याने वाचून काढीत. यावद्दल महादेवभाईची साक्ष आहे वाचून ऐकविणाऱ्याला वेगाने वाचण्यास सागत. तशा स्थितीतही मजकूर त्याच्या लक्षात तपशीलवार राही ! वाचलेल्या मजकुरावर ते स्वतत्रपणे विचार करून त्यातून मौलिक अर्थ काढीत असत. विद्वानानाही त्यानी केलेला अर्थ खोडण्याची हिंमत होत नसे. प्रतिपक्षाच्या किंवा सरकारी निवेदनातूनही ते अनुकूल मुद्दे ताडून घेत. त्याचे युक्तिवाद विनतोड असत. कायावाचामनसा सत्याचीच साधना केल्यामुळें त्याच्या वाणीत ओज निर्माण झाले होते !

• •

# ११ ग्रीष्मऋतूंतील शीतोपचार

**तापत्रयें माझी तापली हे काया । शीतळ व्हावया पाय तुझे ।।**
**– तुकाराम**

पुढील चित्र सन १९४०च्या उन्हाळयातील आहे. वर्धा व त्याचा परिसर उष्ण हवेबाबत प्रसिद्ध आहेत. गांधीजीच्या वयास ७० वर्षे पुरी झाली होती. सन १९३५ पासून गांधीजींनी वर्ध्यास मुक्काम केला होता. १९३६च्या एप्रिलमध्यें ते सेगांवला जाऊन राहिले. उन्हाळयात या प्रदेशात हवामान फार गरम राहाते सकाळी ८ पासून सायंकाळी ५ पर्यंत उन्हाचा ताप अतिशय होतो. त्यामुळें स्त्रिया सकाळी ८ पूर्वीच स्वयंपाक उरकून चूल विझवून टाकतात व रात्र पडल्यावर रात्रीचा स्वयंपाक करण्यासाठी चूल पेटवतात. लहान मुलें पाण्याने भरलेल्या वालद्यात उडी घेण्यासाठी धडपडत असतात! शिवाय उन्हाळयात बहुतेक विहिरी कोरडया होऊं लागतात ही दुसरी आपत्ति ! खेडयातील जीवनाशी समरस होण्यासाठी गांधीजी प्रयत्न करीत होते. वृद्ध वय, जराजर्जर शरीर, रक्तदाबाच्या आजाराने शरीरात घर केले होते – अशा परिस्थितीत त्यांना सेवाग्रामचा उन्हाळा किती जाणवत असेल त्याची कल्पना करावी. आपल्या कुटीत ठाम बसून ते भेटी देत, चर्चा करीत, पत्रें व लेख लिहीत पण हवाफेर करण्यास कोठेंही जात नसत. जंगली पाल्यापाचोळयाचा एक जगम पडदा असे, तो त्यांच्या बैठकीजवळच्या दरवाजास लावून ठेवीत व मधून मधून त्यावर पाण्याचा शिडकाव केला जाई. डोक्यावर जुन्या पद्धतीचा पंखा असे. त्याच्या दोरास खुंटी बांधून ती कोणीतरी हातात धरुन त्यांच्या समोर बसे व पंखा हालवून त्यांना वारा घाली ! या गावठी उपाया-शिवाय आणखी एक रामबाण ( ! ) उपाय ते योजीत ! गांधीजींची मातीवर अपार श्रद्धा होती, प्रीतिही होती. नाना विकारावर मातीचा लेप देण्यास ते सांगत. मातीचा चिखल करून पातळ खादीच्या

कपडयात तो पसरून त्याची घडी करीत व दुपारच्या विश्रांतीच्या वेळी आपल्या पोटावर ती ठेवून घेत. उन्हात फिरतेवेळी आपली बसावयाची छोटी गादी आपल्या मस्तकावर ठेवून घेत. या उपायांनी गारवा मिळतो असा त्यांचा अनुभव होता. खेडयातील लोकांसाठी हा स्वस्त व सोपा उपाय आहे असे त्यांचे मत होते. भूमातेचे ते खरे पुत्र होते!

समुद्रवसने ! देवि ! पर्वतस्तनमण्डले !
विष्णुपत्नि ! नमस्तुभ्यं; पादस्पर्शं क्षमस्व मे ।।

जी भूमाता आपणास आपल्या देहावर धारण करते व अन्नवस्त्र देऊन पोषण करते, तिच्यावर आपण पादप्रहार करतो, हे त्यांना खटकत असे तेव्हा तिला डोक्यावर व पोटावर घेण्यात आपण त्या अवमानाच्या पापातून किंचित् मुक्त होऊ शकतो अशीही त्यांची भावना असावी.

सन १९३९ साली यूरोपात महायुद्ध पेटले ! जर्मनीचा हिटलर भराभर देश पादाक्रांत करीत चालला होता दोस्तराष्ट्रें पराभूत व हताश झाली होती भारतावरही या युद्ध-परिस्थितीचा परिणाम होत होता ! कांग्रेसमध्यें विचारभेद झाले होते गांधीजी अहिंसेवर अढळ श्रद्धा राखून होते, पण इतर पुढारी त्यांच्या भूमिकेवर जाण्यास कचरत होते हिटलरची भरारी या देशावर आली तर त्याचा सशस्त्र प्रतिकार करावा, असे त्यांचे मत होते इंग्रज सरकार सहकार्य मागत होते व काही अटीवर ते देण्याची इच्छा कांग्रेसच्या नेत्यांच्या मनात प्रादुर्भूत होऊ लागली होती प्रजा हवालदिल झाली होती. युद्धाचे परिणाम आर्थिक क्षेत्रात विशेषेंकरून जाणवत होते. सरकारच्या दडपशाहीचा वरवंटाही सुरू झाला होता याच वर्षी गांधीजींनी वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ सुरू केली व पहिले सत्याग्रही म्हणून श्री विनोबा भावे यांची निवड झाली. भविष्य मानवाला दिसत नाही भूतकालापासून धडे घेऊन, भविष्याचा विचार करून, वर्तमानकाली कृति करावयाची असते देशात पुष्कळ पक्ष होते. संस्थानिकांचे धोरणही राष्ट्रीयतेस अनुकूल नव्हते त्या जागतिक आपत्तिकालात, हिंसेचा

प्रचंड झंझावात दशदिशा भरून टाकीत असताना, परकीय अमलाखाली दडपलेल्या व राष्ट्रीय चारित्र्य गमावून बसलेल्या या देशाचे नेतृत्व करणे ही सोपी गोष्ट नव्हती. उन्हाळ्याच्या तापापेक्षा परिस्थितीचा तापच त्यांना जास्त जाणवत होता तरी ते आपल्या ध्येय-धोरणापासून यत्किंचित्‌ही विचलित झाले नाहीत. कारण त्यांचे जीवन पूर्णपणे सत्यनारायणास समर्पित झाले होते !



# १२ संघशक्तींतून सेवायोग

एकमेकां साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ ।।

—तुकाराम

सन १९३८ च्या डिसेंबरात हिंदुस्तान स्काउट्स् असोसिएशनचे स्वयंसेवक सेवाग्रामला आले होते. त्यांनी गांधीजींसमोर संचालन करून दाखवले. गांधीजींना सर्व प्रकारच्या रचनात्मक सेवाकार्यांबद्दल प्रेम वाटे. नवीन तरुणांबद्दल ते फार मोठ्या आशा बाळगून होते. त्यामुळे त्यांच्याशी संबंध येण्याची कोणतीच संधि ते जाऊं देत नसत. जरी ते अहिंसेचे पुरस्कर्ते होते तरी शिस्त, टापटीप, क्रमबद्धता आदि गुणांचे महत्त्व त्यांना अतोनात वाटे आश्रमातून सेवाग्राम खेड्याची सफाई करावयास जाणाऱ्या सेवकदलास त्यांची शिकवणूक असे की, सर्वांनी शिस्तीने एकामागून एक अशा क्रमाने जावे. जाताना कवायतीने पावले टाकीत जावे सोबत न्यावयाची उपकरणी (झाडू, घमेली वगैरे) ज्याप्रमाणे सैनिक बंदुका वगैरे शस्त्रें ऐटीत उचलून नेतात, त्याप्रमाणे ऐटीत घेऊन जावी. आपल्या सेवासाधनाचा आपणास गौरव वाटला पाहिजे, त्यांना हल्के समजू नये असे ते म्हणत. सत्यप्राप्तीचे साधन अहिंसा हे मानल्यावर व्यवहारदेखील अहिंसेवर उभारला जावा असे त्यांचे मत होते व म्हणून त्या दृष्टीने ते प्रयत्न करीत. अर्थातच सेवेच्या कोणत्याही कृतीला तुच्छ लेखता येत नाही. वैयक्तिक स्वच्छता असो की सामाजिक स्वच्छता असो, ती समाजाला छळणाऱ्या अनेक रोगांना प्रतिबंध करण्याची मोहीम आहे, त्यामुळें शत्रूच्या मर्मावर हल्ला करण्यास यद्वत् सैनिक आपली सारी शक्ति एकत्रित करितात, तद्वत् सफाई-स्वयंसेवकांनींही आपले शक्ति-सर्वस्व या कामास लावले पाहिजे आणि रोगांचे उच्चाटण हें शस्त्रांनी शत्रूचा प्रतिकार व नाश करणाऱ्या सैनिकांच्या कार्यवाहीपेक्षा कोणत्या-

ही प्रकारे कमी प्रतीचे नाही हे लक्षात ठेवले पाहिजे देशाचा नाश घडवून आणणारे विविध रोग, आळस, दारिद्र्य हे देशाचे शत्रूच आहेत. त्याना पिटाळून लावण्याचे काम फार महत्त्वाचे आहे व त्यासाठी संघशक्तीने कामास लागले पाहिजे अशी त्याची विचारसरणी होती. यासाठी राजकीय व सामाजिक मतभेद सोडून सर्वांनी एकत्रितपणे कामास लागावे यासाठी ते सतत प्रयत्नशील असत.



त्याचे लाड करू लागले तो वासरू मुतू लागले बलवतसिंह त्याला उचलू लागले पण गाधीजीनी अडवले, म्हणाले, "राहू दे, मुतू दे त्याला !" ते मुतत असता ते तसेच हसत राहिले !

गाई बकऱ्याच्या संतानाना काही आजार झाल्याचे कळले व बलवतसिंहाना इलाज सुचला नाही तर ते तात्काळ तेथे जाऊन पोचत, तपाशीत व इलाज सुचवीत मानवाइतकेच प्रेम ते या पाळीव जनावरावर करीत मागे यग इन्डियाच्या एका लेखात त्यानी गाईवर लेख लिहिताना Cow is a poem of pity (गाय हे करुणेचे काव्य आहे) असे एक गोड वाक्य लिहिले होते ! गाईबद्दल त्याची तीच भावना शेवटपर्यंत होती देशातील सर्व जनतेने आपल्याप्रमाणेच गाईचे पक्षपाती व्हावे अशी त्याची तळमळ होती सन १९२४ साली कैदेतून सुटल्यावर त्यानी विधायक सेवाकार्याच्या ज्या काही सस्था स्थापन केल्या त्यापैकी अखिल भारतीय गोसेवा सघ ही एक होती तो सघ पुढे बद पडल्यावर सन १९४१ साली त्यानी स्व जमनालालजीना गोसेवा करण्यास प्रवृत्त केले. त्यामुळे नव्याने गोसेवासघ निघाला. तरी अद्याप गोसेवेचे कार्य भरभराटीस आलेले नाही

समोरच्या दोन चित्रात बलवतसिंह नवीन जन्मलेले एक वासरू व एक करडू (बकरीचे पिलू) आणून गाधीजीना दाखवीत आहेत गाधीजी त्याना गोजारीत आहेत



# १४ ग्रामोद्योग

★ When industry and virtue meet and kiss,
Holy their union and the fruit is bliss !

सेगावला गाधीजी येण्यापूर्वी मगनवाडीत ग्रामोद्योग सुरु झाले होते श्री. जे सी कुमारप्पा या विद्वान् व प्रतिभाशाली कार्यकर्त्याकडे गाधीजीनी ग्रामोद्योग सघाचे सचालन सोपवले होते त्यानी तेथें सस्था स्थापून विद्यार्थी तयार केले ग्रामोद्योगापैकी एक उद्योग नीरा व गूळ बनविणे हा होता गजानन नाईक नावाचा एक विद्यार्थी या कलेत फार वाकबगार झाला होता गाधीजीनी सेगावला वस्ती केल्यावर गजानन नाईकला बोलावून घेतले व तेथे हा उद्योग सुरू करविला सेवाग्राम खेड्यात व आसपास शिंदीची पुष्कळ झाडे होती. या झाडाच्या झावळ्यापासून खेडेगावचे लोक चटया व पखे बनवीत असत, तर कित्येक झाडाला छिद्रें पाडून, त्याना मडकी लावून रस गोळा करीत व त्यापासून ताडी बनवीत या व्यसनापासून लोकाना मुक्त करावे व रसाचाही सदुपयोग करावा, या हेतूनें गाधीजीनी सरकारकडून खास परवानगी घेऊन शिंदीच्या झाडाच्या रसापासून गोड नीरा व नीरेपासून ताडगूळ बनविण्याचा उद्योग सुरू केला. गजाननराव झाडावर चढून रस काढण्यात स्वत पटाईत तर होतेच शिवाय त्यानी पुष्कळ कार्यकर्ते व मजूर तयार केले व रोज पहाटें झाडाचा ताजा रस आश्रमात येऊ लागला त्याला 'नीरा' हे नाव पडले व सकाळच्या न्याहारीत त्याचा उपयोग केला जाऊ लागला हा रस ताजा असताना फार मधुर व पोषक असतो गावच्या लोकानाही त्याची चटक लागली रोज सकाळी लोक गावातील नीराकेंद्रात नीरा पिण्यास जाऊ लागले दोन पैशाना अर्धा रत्तल गोड नीरा मिळत असे

★ उद्यम सद्‌गुण भेटुनी होता ऐक्य अखड !
पावन त्याचा सगम प्रसवे फल आनद !

नंतर नीरेपासून गूळ तयार करण्यासाठी भट्टी बांधण्यात आली. गजाननराव गुळाचे नित्य नवे नमुने बनवीत व गांधीजींच्या समोर ठेवीत. ते पाहून गांधीजी प्रसन्न होऊन गुळाची व गजाननरावाची तारीफ करीत. आश्रमात ताडगुळाचाच उपयोग होऊ लागला.

समोरच्या चित्रांत गांधीजी सेवाग्राम येथील एका ताडगुळाच्या भट्टीचे निरीक्षण करीत आहेत मागल्या बाजूस कुमारप्पा उभे आहेत. कुमारप्पानी ग्रामोद्योग व सर्वोदयाचे अर्थशास्त्र यावर पुष्कळ पुस्तके लिहिली, ती सर्व अधिकृत मानली जातात.

गांधीजींचे मत होते की, खादी हा सूर्य आहे व ग्रामोद्योग हे ग्रह आहेत. या सूर्यमंडळाच्या आधारे खेड्यातील संस्कृति सुरक्षित व विकसनशील राहील. शेती हा खेड्याचा प्राण आहे सारे उद्योग शेतीवर निर्भर असावे व उद्योगातून शेतीची शक्ति वाढावी. म्हणून त्यांनी गोसेवेच्या जोडीस चर्मोद्योग, कुंभारकाम (भांडी व विटा बनविणे), तेलघाणा, मधुमक्षिकापालन आदि उद्योगांना सुधारलेल्या पद्धतीने पुनरुज्जीवित करण्याचा प्रयत्न केला. कुंभारकाम श्री. चन्द्रप्रकाश अग्रवाल यांनी सांभाळले. चर्मोद्योग श्री. गोपाळराव वाळुंजकर यांनी चालविला. तेलघाणा व मधुमक्षिकापालनाचे काम श्री. छोटेलालजींनी स्वीकारले. याप्रमाणे गांधीजींना कुशल, उत्साही व मेहनती कार्यकर्ते मिळत गेले आणि ग्रामोद्धाराची त्यांची योजना मूर्तरूपास येऊ लागली.

परकीय अमलाखाली असलेले राष्ट्र जेव्हा महापुरुषार्थ करून स्वतंत्र होते, तेव्हा त्याला आपली आर्थिक उन्नति करून घेण्यास पुष्कळ प्रयोग करावे लागतात, परदेशाची मदत घ्यावी लागते व कर्जबाजारीही बनावे लागते. गांधीजींनी देश स्वतंत्र होण्यापूर्वीच आपल्या दूरदृष्टीनें देशाची सुधारणा कोणत्या पद्धतीनें व्हावी, तिचा वेध घेतला होता व खेडे हे स्वराज्याचा घटक धरून त्याच्या उन्नतीसाठी व विकासासाठी सर्व प्रकारच्या योजना अगोदरच आखून ठेवल्या होत्या. नाना प्रयोग करून त्यांनी कार्यकर्ते तयार केले व उद्योगधंद्याचा विकास केला; त्यावर शास्त्रें लिहिली व लिहविली. परंतु स्वातंत्र्य

मिळाल्यावर त्याच्या पश्चात् पुढाऱ्यांनी त्याची वाट सोडून पश्चिमेचा आदर्श स्वीकारला. परिणामी आजची कठिण परिस्थिति समोर उभी राहिली आहे, खेडी उध्वस्त होत आहेत व शहरे फुगत आहेत! शरीर अतोनात फुगले तर त्यात शक्ति राहात नाही. ते केवळ चरबीचा गोळा बनते. आजची भारतातील शहरे तशीच आहेत. खेड्यांकडे दुर्लक्ष झाल्यामुळे शेती व ग्रामोद्योग याचा विकास झाला नाही. खेड्यातील लोक दरिद्री राहिले. अन्नासाठी परदेशावर अवलबून राहावे लागले शरीरे फुगल्यामुळे विकृति वाढली व असतोप पसरून सघटनेची विघटना होऊ लागली! आज तरी सर्वत्र संघर्ष व हिंसा याचाच स्फोट दिसून येत आहे गाधीजीची शिकवणूक न ऐकल्याचे फळ जनतेला भोगावे लागत आहे



# १५ शिक्षणक्षेत्रांत क्रांति

**माझिया जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ।।**
**– तुकाराम**

दक्षिण आफ्रिकेतील यशस्वी चळवळ आटोपून गांधीजी सन १९१५ मध्यें स्वदेशी परत आल्यावर आपल्या पुढील आयुष्यात देशाच्या स्वातंत्र्यासाठीं त्यांनी अखिल भारतीय पायावर तीनदा मोठमोठी आंदोलने केली पहिले आंदोलन सन १९२१-२२ साली झाले, ते त्यांनी चौरीचौराच्या हत्याकांडामुळे मागें घेतले दुसरे सन १९३० मध्ये मिठाच्या सत्याग्रहापासून सुरु झाले ते त्यांनी १९३४ साली मागे घेतले शेवटचे सन १९४०-४२ मध्ये झाले त्यानंतर स्वातंत्र्य मिळाले ।

तथापि देशास स्वातंत्र्य मिळवून देणे हच गांधीजींचे जीवन-कार्य नव्हते. अवताराचा हेतु धर्मसंस्थापना हा असता गांधीजींना देशात सत्याचे साम्राज्य स्थापावयाचे होते त्यासाठी अहिंसा हे साधन त्यांनी मानले होते त्यामुळें सत्यमूलक अहिंसाप्रधान समाज उभारण्या-साठी त्यांना व्यवहारातही क्रांति घडवून आणणे नमप्राप्त होते. त्या-च्या स्वराज्याचा घटक खेडे हे होते खेडीं स्वावलंबी झाली पाहिजेत तर त्यांनी पांच बाबतींत स्वयंपूर्ण होणें आवश्यक होते. त्या पांच बाबी म्हणजे (१) अन्न (२) वस्त्र (३) निवास (४) आरोग्य व (५) शिक्षण या होत सेवाग्राममध्यें त्यांनी पहिल्या चार बाबतींत कोणते प्रयत्न केले त्याचें दिग्दर्शन मागें आलेच आहे. आता पांचवी बाब जी शिक्षण तिच्या बाबतींत सांगावयाचे आहे.

भारतवर्षांतील शिक्षणाची प्राचीन पद्धति ऐतिहासिक काळात टिकली नाही इंग्रजी अमलापूर्वी या देशात कित्येक शतकेपर्यंत अनेक स्वतंत्र राज्ये होतीं इसवी सनाच्या पहिल्या हजार वर्षांत हिंदु, बौद्ध, जैन आदि साम्राज्यें व राज्यें होऊन गेलीं. पुढील कित्येक शतकात

देशाचा फार मोठा भाग मुसलमान राज्यकर्त्यांच्या ताब्यात होता त्या-नतर मराठे प्रबळ झाले. शीखांचेही राज्य उत्तरेकडे होते, पण ते फार टिकले नाही या कालात शिक्षण उच्च वर्गाच्या हाती होते इसवी सनाच्या एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून इग्रजाची सत्ता स्थिर होत गेली व ती दीडशे वर्षे टिकली देशातील सर्व जातीजमातीना शिक्षण दिले जावे हा विचार इग्रजाच्या अमदानीत रूढ झाला. तरी त्यानी इग्रजी भाषेला माध्यम बनविण्याचा प्रयत्न केल्यामुळे त्याचा विचार सफल झाला नाही त्याच्या अमलात सबध देशात साक्षरतेचे प्रमाण दहा टक्के असेल-नसेल शिवाय शिक्षणपद्धति दुबळी होती कोणत्याहि उद्योगाशी तिचा सबंध नव्हता कविवर्य रवीन्द्रनाथ ठाकूर यानी इग्रजी अमलातील शिक्षणाला "पोपटाचे शिक्षण" हे नाव दिले होत त्यात तेज नव्हते ते समाजाच्या मोठ्या थरात प्रवेशू शकले नाही

गाधीजीचे मत असे होते की, शिक्षणासाठी लागणारा पैसा शिक्षणातूनच निघाला पाहिजे अक्षरज्ञान म्हणज शिक्षण नव्हे ते शिक्षणाचे एक साधन आहे, दुसरीही साधने आहेत. प्रत्येक शाळा स्वावलबी बनली पाहिजे त्यासाठी मुलाना अक्षरज्ञान देत असताना सुरुवातीपासूनच एखाद्या धद्याचेही शिक्षण दिले जावे मुले उत्पादक उद्योग करीत असतानाच शिकतील हातानी काम करीत गेल्याने बुद्धि विकास पावत जाते मुलाचा शारीरिक व मानसिक विकास होण्यास ही पद्धति उपयुक्त सिद्ध होईल सर्वांत सोपा व सार्वत्रिक होऊ शकणारा उद्योग म्हणजे सूतकताई होय ! पण त्याशिवाय शेती, सुतारी वगैरे आणखीही उद्योग शिक्षणाशी जुळविता येतील पुस्तकी शिक्षणाने विद्यार्थी पोपट बनतो नुसतेच उद्योग केल्याने तो जड बनेल पण शिक्षणाचा सबध उद्योगाशी जोडला तर शिक्षण तेजस्वी व समर्थ होईल विद्यार्थ्यांचे चारित्र्य वाढेल त्याच्यात गुणाचा उत्कर्ष होईल समाजातील उच्चनीच विषमतेची भावना नष्ट होईल श्रम व श्रमिक याबद्दल समाजाच्या मनात आदराची भावना निर्माण होईल

ता २२ ऑक्टोबर १९३७ रोजी वर्धा येथे मोठी शिक्षण-परिषद भरली होती भाषणे हिंदुस्तानी भाषेत झाली काँग्रेस मन्नि-

मडळें असलेल्या प्रातातून शिक्षणमत्री आले होते व देशातील स्वतत्र विचारक व शिक्षण-तज्ज्ञही आले होते रोज सहा तास याप्रमाणे दोन दिवस काम चालले. दिल्लीच्या सुप्रसिद्ध जामिया मिलिया शिक्षण-सस्थेचे अध्यक्ष डॉ जाकिर हुसेन हे हजर होते श्री आर्यनायकम् व श्री आशादेवी ही दोघे हजर होती या परिषदेंतून निघालेली योजना हरिपुरा येथील काँग्रेस अधिवेशनात चर्चिली गेली व तीतून ठराव-रूपानें हिंदुस्तानी तालीमी सघ ही सस्था जन्मास आली व सेवाग्राम येथेंच तिचे केन्द्र स्थापन झाले सुरुवातीस डॉ जाकिर हुसेनसाहेब तिचे अध्यक्ष व श्री आर्यनायकम् हे चिटणीस होते शिक्षण-पद्धतीस मूलोद्योगी शिक्षण किंवा पायाचे शिक्षण (बुनियादी तालीम) हे नाव मिळाले पूर्व बुनियादी, उत्तर बुनियादी व उत्तम बुनियादी अशा रूपात शिक्षणाची वाढ होत गेली गाधीजींच्या अवसानानतर तेथें ग्रामीण विद्यापीठाची स्थापना झाली

या कामाच्या अनुषगानें डॉ जाकिर हुसेनसाहेब मधून मधून सेवाग्रामला येत तेव्हा गाधीजींना भेटत असत समोरचे चित्र अशाच एका प्रसगीचे आहे हुसेनसाहेब थोर विद्वान् आहेत. जर्मनीत राहून, त्यानी उच्च शिक्षणाची पदवी मिळविली तरी गाधीजींचे शिक्षण-विषयक क्रातिकारक विचार त्याना पटले व त्यानी त्या क्षेत्रात महनीय कामगिरी केली। ते गाधीजींचे साथी बनले।।

शिक्षणासाठी फार पैसा लागतो, तो सरकारजवळ नाही अशी इग्रजी सरकारची तक्रार होती अबकारी खात्यातील पैसे शिक्षण-खात्यास देण्याची व्यवस्था त्या सरकारने केली होती गाधीजींनी दारूबदी अमलात आणवली व पापाच्या पैशाचे उच्चाटण केले। विद्यार्थ्यांनी शिक्षणकालात श्रम करून आपली सस्था स्वावलबी करावी म्हणजे शिक्षणक्रम पुरा झाल्यावर ते अपग व निरुत्साही राहाणार नाहीत, उलट श्रम करून आपला निर्वाह करण्याइतके समर्थ बनतील असे त्याचे मत होते

# १६ लोकसंग्रह

तैसाचि हाही नानापरी । बहुत जनास शाहाणे करी ।
नाना विद्या त्या विवरी । स्थूल सूक्ष्म ।।

– दासबोध

पोलडचे एक एजिनीयर श्री मॉरिस फ्रीडमन या देशात आले. यन्त्रविद्येंत त्याची बुद्धि प्रतिभाशाली होती ! ते म्हैसूर येथें कामास लागले तेथे त्यानी पुष्कळ पुरुषार्थ करून दाखवला असता, पण त्याना श्रीरमण महर्षीचे आकर्षण झाले ! ते सन्यासी झाले व त्यानी भारतानद हे नाव घेतले नतर काही काळ त्यानी आंध्र यथें काम केले व तेथून ते सेवाग्रामला आले. गाधीजीचे विचार त्याना पटले अहिंसा-प्रधान समाजव्यवस्थेंत हस्तोद्योगाना प्रथम महत्त्वाचे स्थान आहे असे त्याचेही मत झाले व त्यानी त्या दृष्टीन अनेक शोध केले त्याचा मुख्य शोध म्हणजे धनुप्तकली ! तकली व चरखा याचा समन्वय त्यानी केला गाधीजीना हस्तोद्योगात केलेले नवे नवे शोध आवडत असतच त्यानी लगेच त्या नवीन शोधाचा स्वीकार केला व धनुप्तकलीवर कातणे सुरू केले गाधीजी यन्त्रवत् कातीत नसत कोणतहि उत्पादक साधन वापरताना ते त्यातील बारकावे पहात, नाना प्रयोग करीत व सुधारणा घडवून आणीत यरवडा चक्राचा शोध लावण्यात गाधीजींचाच मोठा हिस्सा आहे कोणतेही साधन देशातील लक्षावधि गरीब लोकाना "अति साजिरे, स्वल्प, सोपें, फुकाचे," कस होईल याचा विचार ते निरतर करीत असत पुढील चित्रात गाधीजी धनुप्तकलीचे निरीक्षण बारकाईने करीत आहेत

भारतानदजी सरजाम कार्यालय सभाळू लागले त्याच्या मदतीस गोधन्याहून रामप्रसाद व्यास येऊन पोचले या दोघा कुशल कलावता-नी सुतार व गवडी याना खूप शिक्षण दिले विटा, चुना, कौले इत्यादि मालाची बनावट सेवाग्रामात होऊ लागली

सन १९३८ मध्यें श्री रामदासभाई गुलांटी हे वायव्य सरहद्द प्रांताचे रहिवासी सेवाग्रामच्या आश्रमात रहावयास आले. ते घरे बांधणारे यंत्रविद् होते. मोठ्या पगाराची सरकारी नोकरी सोडून ते आले व गांधीजींच्या कार्यास त्यांनी आपले जीवन अर्पण केले. आश्रमातील पुष्कळ घरे त्यांनी बांधली. आश्रमात स्वच्छ पाण्याची व्यवस्था करणे, घाणपाण्याचा निचरा करणे आणि आरोग्याच्या दृष्टीने आश्रमांत वृक्षारोपण करणे ही कामे त्यांनी केली. अर्थात् या सर्व कामांवर गांधीजींची नजर होतीच.

सुरुवातीस बलवंतसिंह यांनी गोशाळा स्थापिली व वाढवली. पण त्यांना गोसेवेचे शास्त्रीय ज्ञान नव्हते. त्यामुळें माजी सत्याग्रहाश्रमातील गोशाळेचे व्यवस्थापक श्री पारनेरकर यांना बोलावून आणून गांधीजींनीं त्यांचे स्वाधीन गोशाळा केली व बलवंतसिंहांना शास्त्रीय शिक्षण घेण्यास पाठविले. पारनेकरांकड शेतीही सोंपवण्यात आली.

सेवाग्राम आश्रमाचे संचालन करतांना गांधीजींचे बारीकसारीक कामावरही लक्ष असे. सुरुवातीस ते स्वतः सर्वांस वाढीत असत, तेव्हा भोजनाचे प्रमाण व गुण याविषयी सूचना करीत. आश्रमाच्या मळ्यांतीलच भाजी खावी, वर्ध्याहून विकत आणू नये असा त्यांचा आग्रह असे. सेवाग्राम खेड्याची सुधारणा करण्यासाठीही त्यांनी योजना आखली. नाणावटींनी ग्रामसफाई करावी, मुन्नालालनी गावातील मुलांना शिकवावे व गावातील बेकार स्त्रीपुरुषांना धंदेशिक्षण देऊन कामास लावावे, असे त्यांनी ठरविले. त्याप्रमाणे कामे सुरू झाली. गावांत जंगम संडास बांधण्यात आले. स्त्रियांसाठी आडोशाचे संडास बांधले गेले.

गावात खादीकाम, आरोग्यविभाग व नीराकेंद्र याप्रमाणे कामें चालू झाली. कामे वाढू लागल्यावर श्री. सुकाभाऊ चौधरी यांचेकडे खादी व सफाई ही कामें देण्यात आली.

सेवाग्राम आश्रम प्रारंभी लहानसा होता पण त्याची वाढ झपाट्याने होत गेली. नुसत्या विधायक सेवाकार्यांचाच पसारा वाढला !

'इवलेसे रोप लावियले दारीं । त्याचा वेलु गेला गगनावेरी ।।'

आश्रमात येऊन, राहून, शिकून, तयार होऊन गेलेल्या कार्यकर्त्यांची गणतीच करता यावयाची नाही गांधीजींच्या महान् तपस्येचे ते फल होते त्यांनी कोणास बांधून ठेवले नाही आपापल्या गरजा तृप्त करून घेऊन आलेले श्रेयार्थी निघून गेले

बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे ।
आपल्या परीस व्हावे । परावे जन ।। — दासबोध

अनेकांना उदंड संस्कार देऊन समाजाची नैतिक, बौद्धिक व कर्तृत्वाची पातळी उंचावण्याचा महाप्रयत्न गांधीजींनी केला

• •

# १७ हिंसेच्या जबड्यांत !

हिताचिया गोष्टी सांगूं एकमेकां । शोकमोहदु:खा निरसूं तेणें ।
एकमेकां करूं सदा सावधान । नामीं अनुसंधान तुटो नेदूं ।।
— नामदेव

गांधीजी खेड्यात जाऊन राहिले आश्रमात ग्रामसुधारणेसाठी नाना प्रयोग चालू झाले, तरी त्याना आपल्या आश्रमात अखड राहाणे शक्य झाले नाही पुरता एक महिना देखील ते राहू शकत नसत काही दिवस राहिले नाहीत, तोच बाहेरचे काम येऊन पडे काँग्रेसच्या कार्यकारिणीच्या बैठकास हजर राहावे लागे गाधीजीच्या सोईसाठी त्या बैठका वारवार वर्धा येथे होऊ लागल्या स्व. जमनालालजीनी आपला बगला, पैसा आणि माणसे, गाधीजीच्या कामास वाहिली होती ।

सन १९३९च्या सुरवातीस चीन व जपान येथून कित्येक सज्जन गाधीजीच्या भेटीस आले होते गाधीजीचे "अहिंसा" तत्त्व सर्व परदेशी लोकाच्या मनात कुतूहल निर्माण करीत असे. आक्रमक जपानशी चीनचे बचावाचे युद्ध चालू होते त्यामुळें चिनी प्रतिनिधीना गाधीजीच्या मार्गाबद्दल जिज्ञासा होती

३० डिसेंबर १९३८ रोजी गाधीजीनी वर्धा येथें मगनवाडी केन्द्रात खादी-ग्रामोद्योगाचे पदार्थसग्रहालय व उद्योगभवन याचे उद्-घाटन केले होते देशाची खरी शक्ति खेड्यात असते व स्वातत्र्यासाठी करावयाची क्राति खेड्यातील उद्योगधदे सघटित व समर्थ केल्यानेच होऊ शकेल असा त्याचा विश्वास त्यानी पुन्हा बोलून दाखवला त्याचे समग्र अर्थशास्त्र त्यानी अभ्यागताना समजावले.

त्यानतर काँग्रेसमधील दुफळी, सुभाषबाबू बोस याचे गाधीजी-विरुद्ध बड व त्याना मिळालेला तात्कालिक जय, राजकोट येथें गाधीजीना करावा लागलेला उपवास, सर मॉरिस ग्वायरनी दिलेला

निवाडा, जो अंतर्गत लाथाळीमुळे त्याना सोडावा लागला आदि घटना होत गेल्या पुढें सुभाषबाबूविरुद्ध कार्यवाही होऊन त्याना काँग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजीनामा द्यावा लागला ! राजेंद्रबाबू अध्यक्ष झाले. तरी गांधीजीची अहिंसा कसोटीला लागत होती. विधायक सेवेच्या क्षेत्रात त्याना खूप चागल्या कार्यकराचा सच मिळाला होता तरी राजकीय क्षेत्रात अहिंसेचा प्रभाव पडेना शेवटी १९३९च्या सप्टेंबरात यूरोपमध्ये महायुद्ध सुरू झाले, तेव्हा ३ सप्टेंबर रोजी इग्लडने जर्मनी-विरुद्ध युद्ध पुकारले ! लगेच भारताच्या इग्रज व्हाइसरॉयने या देशातील पुढारी वा कायदेमडळे यापैकी कोणासही न विचारता हिंदुस्थानच्या नावाने जर्मनीविरुद्ध युद्ध जाहीर केले ! हिंसेने आपला विकाळ जबडा पसरला ! गाधीजीची अहिंसा त्या जबड्यात प्रविष्ट होण्याची वेळ आली ! ! गाधीजीच्या जीवनातील ही फार मोठी कसोटी होती ! राष्ट्रात मतैक्य तर नव्हतेच ! नाना राजकीय सघटना व नाना मताचे पुढारी याचा बुजबुजाट झाला होता परतु दुर्दैव असे की काँग्रेसमध्यही एकी अथवा एकवाक्यता नव्हती ! प्राप्त परिस्थितीचा विचार करण्याकरिता काँग्रेसच्या कार्यकारी मडळाची बैठक वर्धा येथे सप्टेंबर ११ से १४ भरली होती समोरील चित्रात त्याच बैठकीस हजर राहण्यासाठी गाधीजी जवाहरलालजीसह सेवाग्रामहून जात असल्याचे दिसत आहे त्याच्यावर फार मोठा कसोटीचा प्रसग येऊन ठेपला होता युद्धाचा कालाग्नि साऱ्या जगास ग्रासू पहात होता देशात एकमत नव्हते अहिंसेवर पूर्ण निष्ठा केवळ गाधीजीचीच होती अशा वादळातून सुरक्षितपणे देशाला वचावून नेण्याचे कौशल्य दाखवण्याची जबाबदारी गाधीजीवर येऊन पडली होती

१९४०च्या फेब्रुवारीच्या तिसऱ्या आठवड्याच्या अखेरीस बगालमधील मलिकान्दा या गावी गाधीसेवासघाचे वार्षिक समेलन झाले त्यात गाधीजीनी सघ समाप्त करून टाकला ! फक्त दहा कार्य-कर्त्यांची व्यवस्थापक समिति नेमून कामाचे क्षेत्र मर्यादित केले नतर मार्चमध्ये रामगढ येथे काँग्रेस अधिवेशन भरले महायुद्धामुळें हिंदु-स्थानावर राज्य करणारे इग्रज सरकार व काँग्रेस याच्यात तीव्र मत-भेद निर्माण झाले होते काँग्रेसने महायुद्धात इग्रजाना मदत करावी,

महायुद्ध संपल्यावर मदतीचा विचार करून घटनापरिषद बोलावली जाईल, असे सरकारचे म्हणणे होते काँग्रेसचे मागणे होते की, युद्धानंतर देशास स्वातंत्र्य देऊ असे सरकारने तेव्हाच जाहीर करावे. सरकार कबूल करीना. तेव्हा काँग्रेसने सरकारशी असहकार पुकारला. आठ प्रांतात काँग्रेसची मन्त्रिमंडळे होती, त्या सर्वांनी राजीनामे दिले प्रथम राजीनामा मद्रासच्या मन्त्रिमंडळाने दिला

मागील दुसऱ्या चित्रात मद्रासचे मुख्य मंत्री श्री. राजगोपालाचार्य हे राजीनाम्यानंतर सन १९४०च्या जून मध्ये सेवाग्रामला आले असताना गांधीजीशी वार्तालाप करीत आहेत दिवसेदिवस परिस्थिति गंभीर होत चालली होती ! भविष्यकाळात काय होणार आहे, हे कोणी सांगू शकत नव्हता जर्मनीचा नेता हिटलर हा यूरोपातील देश एकामागून एक पादाक्रांत करीत पुढे चालला होता १७ जून १९४० रोजी फ्रान्सने शरणागति पतकरली त्यामुळें सारे देश भयचकित झाले होते ! इंग्रजांचे काय होईल व इंग्रजांचा पराभव झाला तर त्यांच्या मांडलिक देशाचे – त्यातच आपल्या देशाचे काय होईल, हा विचार हृदयाचा थरकाप करीत होता गांधीजींची श्रद्धा व नेतृत्व – दोहोंचीही कसोटी होणार होती !

● ●

# १८ वानप्रस्थाचा पसारा

अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप म्हणोनियां ।।
........................................................................
तुका म्हणे जनां सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ।।

बाहेर देशात व जगात प्रलय झाला तरी सेवाग्रामच्या आश्रमांत विधायक सेवाकार्य व कौटुंबिक घटना चालूच होत्या. एका विशाल कुटुंबाचा पिता या नात्यानें गांधीजींना आपली कर्तव्यें वेळोवेळी पार पाडणे क्रमप्राप्तच होते. आश्रमात ब्रह्मचर्यव्रत पाळले जात असे तरी आश्रमाबाहेरील गांधीजींच्या उपवर व उपवधू संतानांची लग्नेही केव्हा केव्हा आश्रमातच होत ! सन १९३९ व १९४० मध्यें आश्रमांत कित्येक विवाह प्रसंग झाले !

मागे सांगितलेच आहे की खेडयात एकटे राहाण्याच्या उद्देशानें गांधीजी सेगावला येऊन राहिले तरी हळू हळू या वानप्रस्थाचा पसारा वाढतच गेला. ता. १६ जून १९३६ रोजी गांधीजींनी आदिनिवासांत ठाणे दिले. त्यानंतर ३ सप्टेंबर १९३७ रोजी श्री चिमनलालभाई शाह हे आश्रमात राहाण्याच्या हेतूने सेगावला पोंचले, त्यावेळी पुढील मंडळी आश्रमात राहात होती :- भणसाळीभाई, प्यारेलालजी, कनु गांधी, मीराबहन, अम्तुस्सलामबहन, बलवंतसिंहजी, पारनेरकरजी, नाणावटीजी, विजयाबहेन, लीलावतीबहेन, चक्रैया, मुन्नालालभाई, शारदाबहेन, डाह्याभाई जानी व शांतिदासभाई. कस्तुरबाचे जवळ त्यांचा सुमारे पांच वर्षांचा नातु कान्हा हाही राहिला होता. तो गांधीजींचे तृतीय चिरंजीव रामदासभाई यांचा मुलगा ! या मंडळीपैकी बहुतेक व्यक्ती साबरमती येथील सत्याग्रहाश्रमातही राहिलेल्या होत्या. मीराबहन या इंग्लंडचे नाविक सेनापति ॲडमिरल स्लेड यांच्या कन्या होत. श्री अम्तुस्सलामबहन या पतियाळाच्या एका दिवाणाच्या कन्या होत. अमृतलाल नाणावटी अहमदाबादच्या राष्ट्रीय गुजराती विद्यापीठांतील

कार्यकर्ते असून आचार्य कालेलकर यांच्या तालिमीत तयार झालेले होते. चकैया आंध्रप्रांतातून आलेला एक हरिजन तरुण होता शारदा चिमनलालभाईंची कन्या होती चिमनलालभाई सत्याग्रहाश्रमातील सर्वांत जुन्या कार्यकर्त्यांपैकी एक होते सेवाग्रामला आल्यानंतर आश्रमाची व्यवस्था त्यांच्याकडे सोपवण्यात आली, यद्यपि गांधीजी होते तोवर मुख्यत तेच आश्रमव्यवस्था पाहात असत

आदिनिवास, बापूकुटी व बाकुटीनंतर चौथी कुटी बांधली गेली ती सुरुवातीस जमनाकुटी या नावाने ओळखली जात असे जमनालालजींनी बापूकुटी व बाकुटी यांच्या मध्ये पण मागल्या बाजूस पूर्वेला स्वत साठी एक झोपडी बांधली सेवाग्रामला आल्यावर स्वत साठी राहावयास घर हवे, असा त्यांचा हेतु होता. पण तो हेतु फारसा सफल झाला नाही इटलीचे एक सज्जन गृहस्थ आश्रमात राहावयास आले त्यांनी शांतिदास हे नाव घेतले ते या कुटीत राहू लागले

ती कुटी रिकामी असताना खुद्द गांधीजीही तिचा उपयोग कधी कधी स्वत साठी करीत या आश्रमातील त्यांचे शेवटचे काही महिने जमनाकुटीतच गेले सन १९४६ च्या उन्हाळ्यात त्यांना जबरदस्त खोकला झाला होता म्हणून डॉक्टरांनी त्यांना या उंच जोत्याच्या झोपडीत येऊन राहाण्याची शिफारस केली त्याप्रमाणे ते राहिले ता २५ ऑगस्ट १९४६ रोजी ते येथून दिल्लीला व तेथून नोआखालीला रवाना झाले, ते पुन्हा सेवाग्रामला पोचले नाहीत म्हणून त्या झोपडीला नंतर आखिरीनिवास हे नाव देण्यात आले

गांधीजी सेगांवला येऊन राहिले तरी महादेवभाई वर्धा येथें मगनवाडीत राहात असत व रोज वर्ध्याहून आश्रमाचे टपाल घेऊन सेगांवला येत व सायंकाळी परत जात असत तेव्हा सेगांव येथें टपाल-कचेरी नव्हती महादेवभाई वर्ध्याहून सेवाग्रामला येणाऱ्या पाहुण्यांची व्यवस्था पाहात व मगनवाडीतील ग्रामोद्योग कामावरही नजर ठेवीत पुढें त्यांची प्रकृति बिघडली त्यांना रक्तदाबाचा आजार लागू झाला तेव्हा त्यांना सेवाग्राम येथच बोलावून घेणे आवश्यक झाले. प्रथम त्यांचा निवास जमनाकुटीत झाला तेथें ते सहकुटुंब राहू लागले.

त्याचा स्वयपाक स्वतत्र होता. थोड्या दिवसानी त्याचेसाठी वेगळे घर बाधून देण्यात आले. ते बापूकुटीच्या उत्तरेस आहे.

पुढे १९४० मध्ये प्यारेलालजी तुरुगात गेल्यावर त्याच्या जागी किशोरलालभाईंची नेमणूक झाली त्याना दमा होता त्याच्यावरोवर त्याच्या पत्नी गोमतीवहेन याही आल्या अर्थात् त्याचेसाठीही स्वतन्त्र घर बाधून देण्यात आले. महादेवभाईच्या घरासमोरच पूर्वेस किशोरलालभाईचे घर बाधले गेले. त्याच्या प्रकृतीस अनुकूल अशाच पद्धतीने घरबाधणी झाली

आश्रमातील सर्व मडळीना संयुक्त-स्वयपाकघरातच जेवावे लागे तरी महादेवभाई, किशोरलालभाई व पारनेरकरजी याच्या बाबतीत गाधीजीनी अपवाद केला होता त्याना आपापल्या घरी जेवण्याची मुभा होती पारनेरकर विधुर होते तरी त्याच्या वृद्ध मातोश्री त्याचे समवेत राहात कन्या शरद महिलाश्रमात होती गाधीजीनी कुटुबे आणून आश्रमात वसविली त्याचप्रमाणे त्याच्या कौटुबिक जबाबदाऱ्याबाबतही ते जागरूक राहिले. उपवर कन्याचे विवाहही त्यानी स्वत करून दिले.

आश्रमात प्रथम लग्नसस्कार शारदा व विजया याचे झाले सन १९३९च्या सुरुवातीस दोन्ही विवाह एकदमच केले ! गाधीजींनी स्वत कन्यादान केले. श्री नानाभाई भट यानी पौरोहित्य केले केळूच्या बागेत विधि झाला दोन्ही पक्षाचे केवळ सात-आठ मडळी हजर होते एका दिवसात विधि आटोपला ! प्रेक्षकाना गुडदाणीचा प्रसाद वाटण्यात आला !

त्यानतर शरद, कनु गाधी, सौन्दरम्‌वहन, इन्दुमती गुणाजी यानी लग्ने आश्रमात झाली. कनूची पत्नी आभा ही लग्नापूर्वी काही वर्षे आश्रमातच राहून सस्कार घेत होती. आश्रमातच त्याना वाङ्-निश्चय ठरला व लग्न झाले. वाकीच्या कन्या (बहुतेक जणी बाहेर-च्या होत्या) लग्नानंतर आपापल्या पतीगृह आपल्या गावी गेल्या.

गुरुवारीच्या विभात केरळचे हरिजन कार्यकर्ते वेलायुधम् याना विवाहविधि दाखवला आहे. गाधीजी व कस्तुरबा यजमानकृत्य करीत

आहेत. बाजवळ छोटी आभा बसली आहे परचुरे शास्त्री पौरोहित्य करीत आहेत. बाच्या मागील बाजूस महादेवभाई व प्यारेलालजी दिसत आहेत ता. ६–९–१९४० रोजी हा विवाह झाला.

शिरीन काजी नामक एका मुस्लिम कन्येचा विवाहही गाधीजीनी करून दिला. पण पुढें गाधीजीनी ठरवले की, हरिजन व सवर्ण याच्यात लग्न झालें तरच आपण आशीर्वाद देऊ तशा प्रकारची एक सोयरीकही ठरली होती. प्रा. रामचद्र राव यानी आपली कन्या अर्जुन राव नामक एका हरिजन तरुणास देण्याचे ठरवले गाधीजीनी समति दिली पण लग्नापूर्वी वरास शिक्षण-सस्कार देण्यासाठी दोन वर्षे सेवाग्राम आश्रमात ठेवून घेतले. दुर्देवानें त्याच्या विवाहसमयी आशीर्वाद देण्यास गाधीजी राहिले नाहीत तेव्हा श्री ठक्करबापा यानी सेवाग्राम येथें हजर राहून वधूवराचा विवाह लावला व आशीर्वाद दिला !

याप्रमाणे आश्रमात ब्रह्मचर्याची प्रतिष्ठापना केली असताना देखील गृहस्थाश्रमाचे द्वार काही लायक गरजूना उघडे करून दिले जात होते. आश्रमात विवाहितानीही ब्रह्मचर्य पाळले पाहिजे असा दण्डक होता. ज्याना गृहस्थाश्रमी जीवन पसत असे त्याना आश्रमाच्या बाहेर पाठवले जाई अगर आश्रमाच्या आसपास त्याचेसाठी स्वतत्र सोय करून दिली जाई. मानवी मर्यादाचे भान गाधीजी कधीही विसरले नाहीत ! जे स्त्रीपुरुष त्यांना सोडू इच्छित नव्हते, तथापि त्याची सर्वच व्रते पाळू शकत नव्हते, त्याना त्यानी आपल्या सूर्यमडळात आपल्या भोवती फिरणारे ग्रह बनविले, पण कक्षेच्या बाहेर जाऊं दिले नाही !

नद्या, ओढे, नाले मिळति समभावे जलधिला ।

या विशाल कुटुबाला सोबत वागविण्यात गाधीजीना निरतिशय आनद वाटत असे !



# १९ खेड्यांत भारतदर्शन

जो उत्तम गुणें शोभला । तोचि पुरुष महा भला ।
कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ।।

—दासबोध

गांधीजींचे नाव त्रिखंडात गाजत होते. आशिया, आफ्रिका, यूरोप व अमेरिका या सर्वच खंडातून नाना धर्मांचे, नाना वर्णांचे, व नाना दर्जाचे स्त्रीपुरुष त्यांचे भेटीस येत असत. कोणी भेट घेऊन, सुखसंवाद करून, समाधान पावून परत जात, तर कित्येक जण आश्रमात काही काळ राहून त्यांचा सत्संग मिळवून परत जात असत. इंग्लंडमधील प्रसिद्ध उमराव लॉर्ड लोथियन यांनी गांधीजींना पत्र पाठवून भेटीची इच्छा व्यक्त केली. त्यांना मुंबईत भेट देऊन संतोष देणे गांधीजींना शक्य होते, पण मुंबईत त्यांना खऱ्या भारताचे दर्शन होणार नाही व चुकीचे भारतदर्शन घेऊन ते परत स्वदेशी जातील असे गांधीजींना वाटले व म्हणून त्यांनी लॉर्डसाहेबांना कळविले, की त्यांनी सेवाग्रामला येऊन आपली भेट घ्यावी. लॉर्ड लोथियन या गोष्टीस कबूल झाले व तसे त्यांनी गांधीजींना कळविले सन १९४०च्या उन्हाळ्यात ते सेवाग्रामला आले गांधीजींनी जमनालालजींना कळविले की, लॉर्डसाहेबांना वर्ध्याहून बैलगाडीत बसवून सेवाग्रामला आणावे. जमनालालजींना संकोच वाटला पण गांधीजींची आज्ञा मानणेच भाग होते. आश्रमात पोचल्यावर लॉर्ड लोथियन व जमनालालजी बैलगाडीतून खाली उतरले तेव्हा गांधीजींनी प्रार्थनाभूमीवर लॉर्डसाहेबांचे स्वागत केले त्यांच्या राहण्याची व्यवस्था आखिरी-निवासमध्ये करण्यात आली स्वत. गांधीजींनी आपल्या देखरेखीखाली त्यांचेसाठी सर्वप्रकारच्या सोयी करून ठेवल्या होत्या. जेवताना ते पंक्तींत बसत असत व गांधीजी त्यांना स्वत. जवळच बसवून घेऊन आपल्या हाताने

# १९ खेड्यांत भारतदर्शन

जो उत्तम गुणें शोभला । तोचि पुरुष महा भला ।
कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ।।

—दासबोध

गाधीजीचे नाव निखडात गाजत होते. आशिया, आफ्रिका, यूरोप व अमेरिका या सर्वच खडातून नाना धर्माचे, नाना वर्णाचे, व नाना दर्जाचे स्त्रीपुरुष त्याचे भेटीस येत असत. कोणी भेट घेऊन, सुखसंवाद करुन, समाधान पावून परत जात, तर कित्येक जण आश्रमात काही काळ राहून त्याचा सत्संग मिळवून परत जात असत. इग्लडमधील प्रसिद्ध उमराव लॉर्ड लोधियन यानी गाधीजीना पत्र पाठवून भेटीची इच्छा व्यक्त केली. त्याना मुबईत भेट देऊन सतोष देणे गाधीजीना शक्य होते, पण मुबईत त्याना खऱ्या भारताचे दर्शन होणार नाही व चुकीचे भारतदर्शन घेऊन ते परत स्वदेशी जातील असे गाधीजीना वाटले व म्हणून त्यानी लॉर्डसाहेबाना कळविले, की त्यानी सेवाग्रामला येऊन आपली भेट घ्यावी. लॉर्ड लोधियन या गोष्टीस कबूल झाले व तसे त्यानी गाधीजीना कळविले सन १९४०च्या उन्हाळ्यात ते सेवाग्रामला आले गाधीजीनी जमनालालजीना कळविले की, लॉर्डसाहेबाना वर्ध्याहून बैलगाडीत बसवून सेवाग्रामला आणावे. जमनालालजीना सकोच वाटला पण गाधीजीची आज्ञा मानणेच भाग होते. आश्रमात पोचल्यावर लॉर्ड लोधियन व जमनालालजी बैलगाडीतून खाली उतरले तेव्हा गाधीजीनी प्रार्थनाभूमीवर लॉर्डसाहेबाचे स्वागत केले त्याच्या राहाण्याची व्यवस्था आखिरी-निवासमध्ये करण्यात आली स्वत गाधीजीनी आपल्या देखरेखीखाली त्याचेसाठी सर्वप्रकारच्या सोयी करून ठेवल्या होत्या. जेवताना ते पक्तीत बसत असत व गाधीजी त्याना स्वत जवळच बसवून घेऊन आपल्या हाताने

वाढीत, त्याना काय हवे-नको त्याची चौकशी करीत लॉर्ड लोधियन आश्रमात तीन दिवस राहिले ते सर्वांशी मिसळून गेले. त्याना गांधीजीच्या सान्निध्यात आश्रमातील जीवन फार आवडले! "माझ्या सबंध जीवनात हे तीन दिवस जसे शांतीत गेले तसे कधीही कुठेही गेले नाहीत, असा एकान्तवास मला कधीच लाभला नाही, येथे मला अपार शांतीचा अनुभव मिळाला!" असे उद्‌गार त्यानी काढले.

प्रारंभीच्या चित्रात एका खाटेवर गांधीजी व लॉर्ड लोधियन एकत्र बसून सुखसंवाद करीत आहेत आपण ज्या जनतेचे प्रतिनिधि आहो, ती जनता देशात कोठे व कशी वसते, ते लॉर्डसाहेबाना दाखविण्यासाठीच गांधीजीनी त्याना सेवाग्रामला बोलावले होते. खरा भारत कोणता ते त्यानी पाहून घेतले जे इंग्रज शहरातून फिरत व तेथेच मुक्काम करीत त्याना देशाचे खरे चित्र दिसत नसे. खेड्यात पोचल्याशिवाय खरा भारत दिसणे शक्यच नाही म्हणून लॉर्ड लोधियन खेड्यात गेले व तेथे तीन दिवस राहिले त्यामुळें त्याना खऱ्या जनतेचे दर्शन झाले.

ही गांधीजीची दृष्टि झाली लॉर्ड लोधियन याना जो आनंद मिळाला व जी शांति प्राप्त झाली ती ते गांधीजीच्या अनुपस्थितीत एखाद्या भारतीय खेड्यात बसून मिळवू शकले असते असे म्हणता येत नाही. स्वतः गांधीजीना खेड्यात वसलेल्या त्या आपल्या आश्रमात राहून शांति व जीवनानंद मिळत त्यामुळें ते तेथेंच राहाण्याचा आग्रह धरीत. त्यांच्या मनात ऐहिक उपभोगाबद्दल पूर्ण विरक्ति होती. म्हणूनच ते आपल्या परिस्थितीत तटस्थ राहूं शकत या जगात आपल्या मालकीची एकही वस्तु नाही, असे त्यानी आपल्या मृत्युपत्रात पहिलेच वाक्य लिहिले होते. जो आनंद लोभ-मोह-जनित असतो, तो खरा आनंद असूच शकत नाही. शहराच्या वाहेर सृष्टीचे काम-रूप दिसून येते. तिची विविधताही अनंत असते. त्या कामरूपिणी सृष्टीशी तादात्म्य पावणे विरक्त आणि म्हणूनच तटस्थ चित्ताला सहज साधतें. म्हणूनच असा मनुष्य जीवनातील सर्वच प्रसंगांत अलिप्त-

पणे रससेवन करू शकतो तो कधीच जीवनविमुख होत नाही अशा पुरुषाची बुद्धिही कुशाग्र होते तो जगात राहून प्रसन्नपणे आणि अदम्य उत्साहाने कर्मांचा पाऊस पाडीत असतो, तरी देखील कधी श्रांत व क्लान्त होत नाही अशा पुरुषाचा सहवास माणसे शोधीत असतात

लॉर्ड लोथियन यांची रवानगी देखील बैलगाडीतूनच झाली !

# २० गोपुत्राचा महोत्सव

**अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥**

— तुकाराम

महाराष्ट्रात 'पोळा' हा एक विशेष प्रकारचा सण आहे. कोठें कोठें त्याला 'बेंदूर' असेही म्हणतात. हा सण पावसाळ्यात येतो. भारताची प्राचीन संस्कृति कृषि-प्रधान असल्यामुळे बरेचसे सण शेतीच्या भोवताले आहेत. बैल हे शेतीच्या मुख्य साधनांपैकी एक आहे — जिवंत साधन आहे ! प्राचीन काळी एखाद्या पुरुषाचे श्रेष्ठत्व सुचवावयाचे असल्यास त्याला 'पुरुषर्षभ' — पुरुषांतील ऋषभ (बैल) — असे आदराने व कौतुकानें उल्लेखीत बैलाच्या शक्तीवर शेती चाले, धान्य पिके आणि मानवाचे प्राण तर अन्नावर अवलंबून ! त्यामुळे बैलाची पूजा होऊं लागली. त्याच्यासाठी सण उजविण्यात येऊं लागला त्या दिवशी म्हणजे पोळ्याच्या दिवशी बैलाकडून कामें करून घेत नाहीत त्याना स्नान घालून स्वच्छ करतात. त्याची पूजा करून त्याना पुरण-पोळ्या खाऊं घालतात व सायंकाळ होण्यापूर्वी त्यांना सजवून, नटवून, वाद्यें वाजवीत त्याची गावातून मिरवणूक काढतात.

सेवाग्राम आश्रमात गोशाळा होती व शेतीही होती. त्यामुळें वार्षिक गोपूजा व बैलपूजा याचे सण नेमानें उजवले जात. गांधीजी या उत्सवात सामील होत व आश्रमातील स्त्रिया, मुले व पुरुष यासह आनंद करीत.

समोरचे तीन फोटो अशा उत्सवाचे आहेत. वेगवेगळ्या वर्षी झालेल्या या उत्सवात गांधीजींनी उत्साहानें भाग घेतला होता. कोणत्याही सणप्रसंगी मुले हीच उत्सवमूर्ति असतात ! या चित्रातही त्याचाच तन्मय आनंद बोलका झालेला दिसून येतो !

*　　*　　*

सेवाग्राम खेड्यात पुष्कळ गाई होत्या गाई चागल्या जातिवत व पुष्ट असल्या तर बैलाची निपजही चागली होते गाय ही बैल व शेती या दोहोची माता आहे, पर्यायानें मानवाची माता आहे बैलाची केवळ पूजा करूनच त्याच्या ऋणातून मुक्त होण्याचा विचार गाधीजीनी केला नाही गाई-बैलाची सुधारणा करण्याचा महाप्रयत्न त्यानी केला. हिंदुसमाज गोपूजक खरा पण तो गाईंची हेळसाड करीत असे खेड्यातील लोक गाईपासून शेण व बैल मिळावे एवढ्यापुरतीच गाईंची जोपासना करीत त्याचे दूध वाढविण्याचा विचार त्यानी केलाच नाही दुधासाठी ते म्हैशी पाळीत

गाधीजीनी गावातील सर्व गाईंचे दूध आश्रमातर्फे विकत घेण्याचे ठरवले सर्वांना पुरवठा झाल्यावर जें शिल्लक राही त्याचे तूप बनवून ते शहरातून विकले जाई ताक खेड्यातील लोकाना फुकट वाटले जाई दुधातून मलाई काढून घेऊन ते दूध गरम केले जाई व सेवाग्राम खेड्यातील शाळेंतील मुलाना रोज गुळाबरोबर प्यावयास दिले जाई अर्थात् मुले आश्रमात येऊन ते पीत असत

पुढें पारनेरकरानी हे काम आणखी वाढविले शेजारच्या गावातूनही दूध गोळा करण्याचा प्रघात त्यानी पाडला दुधातील तूपसत्वाचे प्रमाण शास्त्रीय पद्धतीनें तपासले जाई व गाईच्या मालकाना गाईसाठी सकस खुराक दिला जाई यातून पुढें सहकारी तत्त्वावर गोशाळा सघटित झाली सात वर्षे ही व्यवस्था चालू राहिली नतर नियम कडक केल्यामुळे दोन वर्षे ती व्यवस्था बद पडली त्यानतर हिंदुस्तानी तालीमी सघाच्या वतीने श्री शाताबाई नारूळकर यानी तिचे पुनरुज्जीवन केले. तेव्हापासून स्थानिक गाई व बैल त्याचप्रमाणे गुराखी याची परिस्थिति खूप सुधारली ।

आजकाल शेतात ट्रॅक्टरनें नागरटी करण्याची प्रथा वाढत आहे गाधीजींना हे मान्य नव्हते माणसें यत्राची गुलाम बनू नयेत, यत्रें त्याच्या ताब्यात असावी, यत्रामुळें माणसे बेकार बन नयेत असें त्याचे मत होते त्याचप्रमाणे ट्रॅक्टर बैलाच्या मुळावर येईल हे जाणून

त्यानी ट्रॅक्टरच्या वापरास विरोध केला होता. त्याचे मत शास्त्रीय होते. अनुभवाने सिद्ध झाले आहे की सतत ट्रॅक्टरचा उपयोग केल्यास जमिनीचा सुपीकपणा कमी होत जातो. बैलाच्या मदतीनें जमीन नागरल्यास तिचा कस कायम राहातो, शिवाय त्याच्या शेणापासून सेन्द्रिय खत मिळते तो विशेष फायदा !



सेवाग्राम खेड्यांत पुष्कळ गाई होत्या. गाई चांगल्या जातिवंत व पुष्ट असल्या तर बैलाची निपजही चांगली होते. गाय ही बैल व शेती या दोहोंची माता आहे, पर्यायानें मानवाची माता आहे. बैलाची केवळ पूजा करूनच त्याच्या ऋणातून मुक्त होण्याचा विचार गांधीजींनी केला नाही गाई-बैलांची सुधारणा करण्याचा महाप्रयत्न त्यांनी केला. हिंदुसमाज गोपूजक खरा पण तो गाईंची हेळसांड करीत असे. खेड्यातील लोक गाईंपासून शेण व बैल मिळावे एवढ्यापुरतीच गाईंची जोपासना करीत. त्यांचे दूध वाढविण्याचा विचार त्यांनी केलाच नाही. दुधासाठी ते म्हैशी पाळीत.

गांधीजींनी गावातील सर्व गाईंचे दूध आश्रमातर्फे विकत घेण्याचे ठरवले सर्वांना पुरवठा झाल्यावर जें शिल्लक राही त्याचे तूप बनवून ते शहरातून विकले जाई ताक खेड्यातील लोकांना फुकट वाटले जाई. दुधातून मलाई काढून घेऊन ते दूध गरम केले जाई व सेवाग्राम खेड्यातील शाळेंतील मुलांना रोज गुळाबरोबर प्यावयास दिले जाई. अर्थात् मुले आश्रमात येऊन ते पीत असत

पुढे पारनेरकरांनी हे काम आणखी वाढविले. शेजारच्या गावातूनही दूध गोळा करण्याचा प्रघात त्यांनी पाडला. दुधातील तूपसत्वाचे प्रमाण शास्त्रीय पद्धतीनें तपासले जाई व गाईच्या मालकांना गाईंसाठी सकस खुराक दिला जाई. यातून पुढे सहकारी तत्त्वावर गोशाळा संघटित झाली सात वर्षे ही व्यवस्था चालू राहिली. नंतर नियम कडक केल्यामुळें दोन वर्षे ती व्यवस्था बंद पडली. त्यानंतर हिंदुस्तानी तालीमी संघाच्या वतीने श्री शांताबाई नारूळकर यांनी तिचे पुनरुज्जीवन केले. तेव्हापासून स्थानिक गाई व बैल त्याचप्रमाणे गुराखी यांची परिस्थिति खूप सुधारली !

आजकाल शेतांत ट्रॅक्टरनें नांगरटी करण्याची प्रथा वाढत आहे. गांधीजींना हे मान्य नव्हते. माणसें यंत्राची गुलाम बनू नयेत, यंत्रें त्यांच्या ताब्यात असावी, यंत्रामुळें माणसे बेकार बनू नयेत असें त्यांचे मत होते. त्याचप्रमाणे ट्रॅक्टर बैलाच्या मुळावर येईल हें जाणून

# २१ गोवंश विस्तार

स्वानंदाचे तार्टी धूप दीप पंचारती वो ।
ओवाळिली माता विठाबाई पंचभूतीं वो ।।

– तुकाराम

गाधीजीच्या अर्धांगी माता कस्तुरबा या भक्तवृत्तीच्या होत्या गाधीजींची भक्ति शास्त्रीय होती, समाजाशी ओतप्रोत झाली होती तिचे लक्ष्य जनता-जनार्दन होते हृदयातील भक्ति मनातील विचाराना प्रेरणा देई. विचार वाणी व कृति यात प्रकट होत व त्यातून सारी शक्ति जनतेचे कल्याण करण्यात खर्च होई ' या उलट कस्तुरबाची भक्ति सगुण उपासनेची द्योतक होती त्याच्यावर परंपरेचे सस्कार होते. सारे सण, सारी व्रते त्याना माहीत होती. गाधीजीना आपली एकादश व्रते जितकी प्रिय होती, तितकीच कस्तुरबाना आपली परपरागत व्रते प्रिय होती ती त्या कधी सोडीत नसत त्या निमित्ताने आश्रमातील मडळीनाही प्रसाद मिळत असे

गाधीजीच्या गोभक्तीतून गोसेवासघाची स्थापना झाली गाईची सुधारणा झाली, पशु व मानव दोघाचाही फायदा झाला गोपूजेची शास्त्रीय मीमासा करण्यात आली तेव्हा गोपालन हे एक जीवनकर्तव्य असल्याचे समाजाच्या लक्षात येऊं लागले पण कस्तुरबाना 'बोरचोथ' (श्रावणातील चतुर्थी) येताच गोपूजेची आठवण होई व त्या बलवतसिहाना सागत, "मला आज गोपूजा करायची आहे एक चागली गाय सवत्स घेऊन ये" त्याप्रमाणे 'देवकी' गाय सवत्स पुढें आणून उभी करण्यात येई व बा पूजासाहित्य घेऊन तिची पूजा करीत

समोरच्या चित्रात कस्तुरबा गोपूजेसाठी सिद्ध झालेल्या दिसत आहेत.

दुसऱ्या चित्रात एक पुष्ट गोमाता आपल्या दोन तासाच्या वासरासह उभी आहे. गाधीजी आपल्या परिवारासह तिचे निरीक्षण

# २१ गोवंश विस्तार

स्वानंदाचे ताटीं धूप दीप पंचारती वो ।
ओवाळिली माता विठाबाई पंचभूतीं वो ।।

– तुकाराम

गांधीजींच्या अर्धांगी माता कस्तुरबा या भक्तवृत्तीच्या होत्या गांधीजींची भक्ति शास्त्रीय होती, समाजाशी ओतप्रोत झाली होती तिचे लक्ष्य जनता-जनार्दन होते हृदयातील भक्ति मनातील विचारांना प्रेरणा देई विचार वाणी व कृति यांत प्रकट होत व त्यातून सारी शक्ति जनतेचे कल्याण करण्यात खर्च होई ! या उलट कस्तुरबांची भक्ति सगुण उपासनेची द्योतक होती त्यांच्यावर परंपरेचे संस्कार होते. सारे सण, सारी व्रते त्यांना माहीत होती. गांधीजींना आपली एकादश व्रते जितकी प्रिय होती, तितकीच कस्तुरबांना आपली परंपरागत व्रते प्रिय होती ती त्या कधी सोडीत नसत त्या निमित्ताने आश्रमातील मंडळींनाही प्रसाद मिळत असे

गांधीजींच्या गोभक्तीतून गोसेवासंघाची स्थापना झाली गाईंची सुधारणा झाली, पशु व मानव दोघांचाही फायदा झाला गोपूजेची शास्त्रीय मीमांसा करण्यात आली तेव्हा गोपालन हे एक जीवनकर्तव्य असल्याचे समाजाच्या लक्षात येऊ लागले पण कस्तुरबांना 'बोरचौथ' (श्रावणातील चतुर्थी) येताच गोपूजेची आठवण होई व त्या बलवंतसिंहांना सांगत, "मला आज गोपूजा करायची आहे एक चांगली गाय सवत्स घेऊन ये " त्याप्रमाणे 'देवकी' गाय सवत्स पुढे आणून उभी करण्यात येई व बा पूजासाहित्य घेऊन तिची पूजा करीत

समोरच्या चित्रात कस्तुरबा गोपूजेसाठी सिद्ध झालेल्या दिसत आहेत

दुसऱ्या चित्रात एक पुष्ट गोमाता आपल्या दोन तासांच्या वासरासह उभी आहे गांधीजी आपल्या परिवारासह तिचे निरीक्षण

करीत आहेत पाळीव जनावराचे आरोग्य, पुष्टि व तुष्टि याकडे त्याचे लक्ष असे गीतेच्या अनुशासनाप्रमाणे वैश्याचा धर्म "कृषि गोरक्ष्य-वाणिज्यम्" हा आहे गाधीजी वैश्य होते त्यानी शास्त्रविहित स्वधर्म मनापासून पाळला। कस्तुरबा पुराणाचा शब्दार्थ पकडून गोमातेची पूजा करून तिला ओवाळीत होत्या, तर गाधीजी भूतमात्रातील ईश्वरी विभूति उत्कर्षाने प्रकट व्हावी व तिच्यापासून समाजाचे भले व्हावे, परस्पराचे रक्षण करून सर्वांचेच श्रेय व्हावे, व अशा उपासनेतून शेवटी अहकाराचा महदानदात – परब्रह्मात – लय करावा या उद्देशाने गोपूजा करीत होते याप्रमाणे त्या लोकविलक्षण दपतीने जीवनातील प्राचीन व अर्वाचीन दोन्ही सस्कृति साभाळल्या।

आश्रमात व गावात गाईची सख्या वाढली तेव्हा गोचरभूमि वाढवण्याच्या दृष्टीने मोठ्या नाल्याजवळील बन नावाचे शेत खरेदी करण्यात आले जमनालालजीची शेती तर आश्रमाने घेतलीच शिवाय नवीन शेतेही विकत घेतली गाईबैल व शेतजमीन याचा अविनाभाव सबध आहे। नतर नवीन मोठी व पक्की गोशाळा बाधण्यात आली व तिला जोडून पक्के दूधघर तयार झाले आश्रमाचा विस्तार होत गेला, तालीमी सघ, कस्तुरबा रुग्णालय, खादी केन्द्र आदि सस्था निर्माण झाल्यावर माणसे वाढली, मुले वाढली त्यामुळे दुधाची गरजही अतोनात वाढली।



# २२ या देवी शक्तिरूपेण---

भूतीं देव म्हणोनि भेटतो या जना। नाहीं हे भावना नरनारी ।।
जाणे भाव पांडुरंग अंतरींचा। नलगे द्यावा साचा परिहार ।।
दयेसाठीं केला उपाधि पसारा। जड जीवा तारा नाव कथा ।।
तुका म्हणे नाहीं पडत उपवास। फिरतसे आस धरोनिया ।।

गाधीजीचे परमप्रिय गीत "वैष्णवजन" – लक्षणे सागणारे – त्यात एक ओळ अशी आहे –

**समदृष्टी ने तृष्णा त्यागी परस्त्री जेने मात रे।**

गाधीजीचे हृदय समाजाशी इतके एकरूप झाले होते की, स्त्री व पुरुष याच्यातील भेदभावाचे वधन त्याच्यापुरते तुटून गेले होते ! त्याच्यात आसक्ति अथवा तृष्णा नव्हती त्यामुळे ते समदृष्टि झाले होते पुढें पुढें ते आपल्या पत्नीलाही 'बा' म्हणून सबोधू लागले होते स्त्री-दाक्षिण्याचे याहून उदात्ततर उदाहरण दुसरे कोणते असेल ? स्वामी रामकृष्ण परमहस यानाही आपल्या पत्नीमध्ये कालीमातेचे दर्शन होत असे गाधीजी सेवाग्रामला जाऊन वसले तेव्हा त्याची साठी उलटून सत्तरी जवळ आली होती त्यामुळे स्त्रीमात्र त्याना मुली व भगिनी-सारख्या वाटत स्त्रियातील विशिष्ट गुणाचे वर्णन श्रीमद्भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायात आले आहे –

**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणा स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा।**

हे सप्तगुण स्त्रियात आहेत पण ते कुटुवाच्या संकुचित वधनात अडकून पडले आहेत म्हणून त्याची वाढ होत नाही. स्त्रिया 'वसुधैव कुटुवकम्' या वृत्तीने समाजात वावरू लागतील तर त्याच्यातील हे गुण व शक्ति तर वाढतीलच पण समाजातील वातावरण शुद्ध होईल, राजकीय क्षेत्रात स्त्रियानी प्रवेश केला तर ते क्षेत्रही शुद्ध होईल, अशी गाधीजी-ची श्रद्धा होती.

करीत आहेत पाळीव जनावराचे आरोग्य, पुष्टि व तुष्टि याकडे त्याचे लक्ष असे गीतेच्या अनुशासनाप्रमाणे वैश्याचा धर्म "कृषि गोरक्ष्य-वाणिज्यम्" हा आहे गाधीजी वैश्य होते त्यानी शास्त्रविहित स्वधर्म मनापासून पाळला। कस्तुरबा पुराणाचा शब्दार्थ पकडून गोमातेची पूजा करून तिला ओवाळीत होत्या, तर गाधीजी भूतमात्रातील ईश्वरी विभूति उत्कर्षाने प्रकट व्हावी व तिच्यापासून समाजाचे भले व्हावे, परस्पराचे रक्षण करून सर्वांचेच श्रेय व्हावे, व अशा उपासनेतून शेवटी अहकाराचा महदानदात – परब्रह्मात – लय करावा या उद्देशानें गोपूजा करीत होते याप्रमाणे त्या लोकविलक्षण दपतीने जीवनातील प्राचीन व अर्वाचीन दोन्ही सस्कृति साभाळल्या।

आश्रमात व गावात गाईची सख्या वाढली तेव्हा गोचरभूमि वाढवण्याच्या दृष्टीने मोठ्या नाल्याजवळील वन नावाचे शेत खरेदी करण्यात आले जमनालालजीची शेती तर आश्रमाने घेतलीच शिवाय नवीन शेतेही विकत घेतली गाईबैल व शेतजमीन याचा अविनाभाव सबध आहे। नतर नवीन मोठी व पक्की गोशाळा बाधण्यात आली व तिला जोडून पक्के दूधघर तयार झाले आश्रमाचा विस्तार होत गेला, तालीमी सघ, कस्तुरबा रुग्णालय, खादी केन्द्र आदि सस्था निर्माण झाल्यावर माणसे वाढली, मुले वाढली त्यामुळें दुधाची गरजही अतोनात वाढली।

● ●

त्यामुळें त्यानी प्रथमपासून स्त्रियाना सार्वजनिक सेवा-क्षेत्रात प्रवेश करण्यास उत्तेजन दिले. सुरुवात त्यानी आपल्या गाधीकुटुबा-पासून केली. त्याची पत्नी व चुलतसुना आफ्रिकेत असताना तुरुंगात जाऊन आल्या भारतात परत आल्यावर त्यानी साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमात स्त्रियाना योग्य सस्कार देऊन कार्यक्षम करण्याचा प्रयत्न केला आश्रमातील अशिक्षित स्त्रिया देखील चळवळीत शिरल्या; त्यानी लाठ्या खाल्ल्या, तुरुगवास भोगला, सेवा केली!

सेवाग्राम येथें आल्यावर स्त्रियाना अधिक सधि मिळत गेली सुरुवातीस श्री मीराबहन व बा या होत्या. नंतर विजयाबेन पटेल, अम्तुस्सलामबहन, लीलावतीबहेन, शारदाबहेन, मुन्नालालजीच्या पत्नी कचनबहेन, शाताबाई नारूळकर, जोहराबहेन, डॉ सुशीला नायर, राजकुमारी अमृतकौर, पुष्पाबहेन, आभा चट्टोपाध्याय, रगनायकी, मनु गाधी, देवीबहन, अमलाबहन, उमादेवी, आशादेवी, वीरम्मा, राम-प्यारीबहन याप्रमाणे अनेक स्त्रिया सेवाग्रामच्या आश्रमात काही काळ राहून गाधीजीकडून सस्कार घेऊन नतर आपापल्या स्वतत्र केन्द्रात जाऊन कामें करू लागल्या शिवाय पुरुषकार्यकर्त्यांच्या सहचारिणी असत त्या आश्रमात राहून वेळ प्रसगी सेवा बजावीत महादेवभाईंच्या पत्नी दुर्गाबहेन, चिमनलालभाईंच्या पत्नी शकरीबहेन, किशोरीलाल-भाईंच्या पत्नी गोमतीबहेन आदि भगिनींची नावे देता येतील

विजयाबहेन गुजरातहून आल्या होत्या प्रारभी बाच्या कामात मदत करीत. गाधीजीच्या लेखिकेचे कामही त्यानी काही दिवस केले होते स १९३९त त्याचे लग्न झाले, नतर त्या गेल्या. अम्तुस्सलामबहेन गाधीजीची वैयक्तिक सेवा करीत असत. सिंध प्रातात हूर प्रकरण गाजले होतें तेव्हा त्याना गाधीजींनी तिकडे पाठवून हूराना समजावण्याचे काम दिले होते ते त्यानी प्रभावी पद्धतीनें पार पाडले! गाधीजी नोआखालीला गेले तेव्हा त्याही तिकडे गेल्या व आपली निर्भयता, सर्व-धर्म-समभाव व असीम त्यागशक्ति यानी तेथील बहुसख्य मुस्लीम जमातीस त्यानी चकित केले!

सुरुवातीच्या चित्रात गाधीजी व त्याच्या उजव्या हातास जोहरा-बहेन आणि डाव्या हातास लीलावतीबहेन आहेत अम्तुस्सलामबहेन

त्यामुळें त्यानी प्रथमपासून स्त्रियाना सार्वजनिक सेवा-क्षेत्रात प्रवेश करण्यास उत्तेजन दिले. सुरुवात त्यानी आपल्या गाधीकुटुबा-पासून केली. त्याची पत्नी व चुलतसुना आफ्रिकेत असताना तुरुंगांत जाऊन आल्या. भारतात परत आल्यावर त्यानी साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमात स्त्रियाना योग्य सस्कार देऊन कार्यक्षम करण्याचा प्रयत्न केला आश्रमातील अशिक्षित स्त्रिया देखील चळवळीत शिरल्या; त्यानी लाठ्या खाल्ल्या, तुरुगवास भोगला, सेवा केली !

सेवाग्राम येथें आल्यावर स्त्रियाना अधिक संधि मिळत गेली. सुरुवातीस श्री मीराबहन व बा या होत्या. नंतर विजयाबेन पटेल, अम्तुस्सलामबहन, लीलावतीबहेन, शारदाबहेन, मुन्नालालजीच्या पत्नी कचनबहेन, शाताबाई नारूळकर, जोहराबहेन, डॉ सुशीला नायर, राजकुमारी अमृतकौर, पुष्पाबहेन, आभा चट्टोपाध्याय, रगनायकी, मनु गाधी, देवीबहन, अमलाबहन, उमादेवी, आशादेवी, वीरम्मा, राम-प्यारीबहन याप्रमाणे अनेक स्त्रिया सेवाग्रामच्या आश्रमात काही काळ राहून गाधीजीकडून संस्कार घेऊन नतर आपापल्या स्वतंत्र केन्द्रात जाऊन कामें करू लागल्या. शिवाय पुरुषकार्यकर्त्यांच्या सहचारिणी असत. त्या आश्रमात राहून वेळ प्रसंगी सेवा बजावीत महादेवभाईंच्या पत्नी दुर्गाबहेन, चिमनलालभाईंच्या पत्नी शकरीबहेन, किशोरीलाल-भाईंच्या पत्नी गोमतीबहेन आदि भगिनींची नावे देता येतील.

विजयाबहेन गुजरातहून आल्या होत्या. प्रारभी बाच्या कामात मदत करीत गाधीजीच्या लेखिकेचे कामही त्यानी काही दिवस केले होते. स १९३९त त्याचे लग्न झाले, नतर त्या गेल्या. अम्तुस्सलामबहेन गाधीजीची वैयक्तिक सेवा करीत असत. सिंध प्रातात हूर प्रकरण गाजले होते तेव्हा त्याना गाधीजीनी तिकडे पाठवून हूराना समजावण्याचे काम दिले होते. ते त्यानी प्रभावी पद्धतीनें पार पाडले ! गाधीजी नोआखालीला गेले तेव्हा त्याही तिकडे गेल्या व आपली निर्भयता, सर्व-धर्म-समभाव व असीम त्यागशक्ति यानी तेथील बहुसख्य मुस्लीम जमातीस त्यानी चकित केले !

सुरुवातीच्या चित्रात गाधीजी व त्याच्या उजव्या हातास जोहरा-बहेन आणि डाव्या हातास लीलावतीबहेन आहेत. अम्तुस्सलामबहेन

यानी गुजरातेत चरखाप्रचाराचे उत्तम कार्य केले । सन १९४०च्या सुमारास त्यानी साबरमतीहून एका नवविवाहित मुसलमान जोडप्यास सेवाग्राम आश्रमात आणले. श्री अकबरभाई आपली बिबि जोहरा-बहेन हिचेसह पाच वर्षे सेवाग्रामच्या आश्रमात राहिले जोहराबहेननी कस्तुरबा ट्रस्ट तर्फे परिचारिकेचा शिक्षण-क्रम पुरा केला नंतर ती दोघे उत्तर गुजरातमध्ये एका खेड्यात राहून ग्रामसेवा करू लागली.

लीलावतीबहेन पूर्वी साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमात होत्या. १९३० ते १९३४ पर्यंत त्या चळवळीत होत्या व म्हणून तुरुगातही गेल्या होत्या त्याचे गुजराती शिक्षण झाले होते, पण त्याना समाधान नव्हते. त्याना इग्रजी शिकण्याची उत्कट इच्छा होती सन १९३४ नतर त्या काही काळ राजकोट येथे होत्या तेथें त्याना समाधान मिळाले नाही म्हणून त्या सेवाग्रामला आल्या गाधीजीनी त्याचेकडे सयुक्त स्वयपाकघर सोपवले पण त्याना आपल्या धाकट्या भावाबद्दल चिता वाटत असे. त्याना चितामुक्त करण्याच्या हेतूने गाधीजीनी त्याला आश्रमात बोलावून घेतले. त्याला प्रथम आश्रमात काम दिले; नंतर मगनवाडीत शिकावयास ठेवले तो पुढे टिकला नाही खुद्द लीलावतीबहेननाही इग्रजी शिकण्याची उत्कठा असल्यामुळे त्याना मुबईत ठेवून मदतीसाठी त्याच्या जातीतून छात्रवृत्ति मिळण्याची व्यवस्था गाधीजीनी केली त्या पुढें मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्या व नतर एम् बी बी एस् होऊन व्यवसाय करू लागल्या

अमलाबहन या जर्मन ज्यू होत्या नाझी जर्मनीच्या काळात त्या पळून येथें आल्या होत्या. उमादेवी या पोलडच्या होत्या महायुद्धात पोलडवर आक्रमण झाले तेव्हा त्या स्वदेशी गेल्या शारदाबहेन या चिमनलालभाईच्या मॅट्रिक पास झालेल्या कन्या ! गाधीजीजवळ राहून त्या किरकोळ कामें करीत. त्याची प्रकृति लहानपणापासून नाजूक व अशक्त होती सन १९३९ साली त्याचाही विवाह होऊन त्या पतीबरोबर सुरतेस गेल्या. शाताबाई नारूळकर या सुशिक्षित भगिनी होत्या; विलायतेत राहून शिक्षण घेऊन आल्या होत्या. हिंदुस्तानी तालीमी सघाचे काम वाढू लागले तेव्हा अनेक स्त्रीपुरुष कार्यकर्ते त्या संस्थेत गोळा झाले त्यापैकीच एक शाताबाई या होत्या. गाधीजीच्या

सांगण्यावरून त्या सेवाग्राम खेड्यात ग्रामसेविका म्हणून जाऊन राहिल्या. सन १९४५ पासून सुमारे चार वर्षे तेथेंच राहून त्यांनी —कोणाची मदत नसता— एकटे राहून त्या खेड्यात विलक्षण सुधारणा करून दाखवली ! तेथे शाळा सुरू केली, खादीचे उत्पादन होऊ लागले, नीराकेन्द्र सुरू झाले ग्राम आरोग्य केन्द्र, सहकारी गोशाळा, ग्रामसफाई, न्यायपंचायत, ग्रामपंचायत, सहकारी वस्ती, सहकारी दुकान वगैरे पुष्कळ संस्था स्थापन करून त्यांनी गावाचे रूपच बदलून टाकले ! रंगनायकीबहन या मद्रासकडच्या होत्या आश्रमात मधून मधून येऊन राहात असत गांधीजींना त्या आपल्या जन्मदात्या पित्याप्रमाणे मानीत असत. देवीबहन मुंबईच्या होत्या त्यांच्याही अडचणी गांधीजींनी दूर केल्या सन १९४२ पूर्वी पंजाबच्या रामप्यारीबहन सेवाग्रामला मधून मधून येऊन राहात असत पांचसात पोळ्या एकदमच भाजून घेण्याची सोय असलेला एक मातीचा पेटीवजा 'तंदुळ' त्यांनी बनविला होता सेवाग्रामहून एक हरिजन मुलगा आपल्याबरोबर घेऊन त्या पंजाबला परत गेल्या त्याला आपल्या घरी ठेवून घेतले व कताईपिंजाई शिकविण्यासाठी त्याला शिक्षक नेमले !

गांधीजींचे एक नातलग श्री जयसुखलाल गांधी यांची सर्वांत धाकटी कन्या मनु हिची आई वारल्यावर तिला गांधीजींनी आपल्याकडे बोलावून घेतले कस्तुरबांनी तिला मुलीप्रमाणे सांभाळले पुढें आगाखान महालात कस्तुरबांच्या अखेरच्या आजारात मनूने त्यांची सेवा केली त्यानंतर गांधीजींनी तिजवर छत्र धरले !

धारवाडचे श्री करिअप्पा यांनी एका हरिजन अपंग मुलीशी लग्न केले होते गांधीजींनी दोघांनाही जवळ जवळ वर्षभर सेवाग्रामच्या आश्रमात ठेवून घेतले होते नंतर ते आपल्या प्रांतात जाऊन तेथे एक आश्रम चालवू लागले. सन १९४२ च्या चळवळीत त्यांनी आपला एक हात गमावला — तो अर्धा तुटला !

विजयानगरच्या महाराणी देखील वारवार आश्रमात येऊन गांधीजींचा सत्संग मिळवीत असत त्या एक भक्त बाई होत्या

प्यारेलालजींची प्रकृति बिघडल्यामुळे त्यांच्या कनिष्ठ भगिनी सुशीला नायर या डॉक्टरची परीक्षा पास झाल्यावर सन १९३७ च्या

अखेरीस आश्रमात येऊन भावाजवळ राहिल्या. त्या आल्यामुळे प्रथम छोटया प्रमाणावर आखिरी-निवासच्या एका खोलीत दवाखाना सुरू झाला. आश्रमातील पाच व खेडयातील चार स्त्रीपुरुष व्यक्तींना त्यांनी औषधोपचाराचे चागले शिक्षण दिले. प्रथम त्या स्थिर झाल्या नव्हत्या. सन १९४४ त कैदेतून सुटून आल्यावर त्या सेवाग्राम आश्रमात स्थिर झाल्या व नंतर दवाखाना आखिरी-निवासमधून बिर्लाभवनात (सध्या जेथें आहे तेथें) नेण्यात आला. पुढे त्याचा पुष्कळ विकास झाला.

सन १९३९-४० च्या सुमारास कलकत्याचे अमृतलाल चट्टोपाध्याय आपली मुले घेऊन सेवाग्रामला आले त्यांनी जेलरची नोकरी सोडली होती. कुटुंब मोठें असल्यामुळें ते अडचणीत होते. त्याच्या चार मुलाची जबाबदारी गाधीजींनी घेतली व हळू हळू त्याची योग्य व्यवस्था केली. त्यापैकी मुलगी आभा हिचे लग्न पुढे कनु गाधी याचेशी झाले तिने शेवटपर्यंत गाधीजीजवळ राहून त्याची सेवा केली.

पुष्पाबहेन गुजरातमधून आल्या. सेवाग्रामच्या आश्रमात राहून त्यांनी संस्कार घेतले व नतर खादी विद्यालयात राहून शिक्षण घेतले. वयास वीस वर्षे पुरी होण्यापूर्वीच त्या गुजरातमधील कस्तुरबा ट्रस्ट तर्फे चालणाऱ्या ग्रामसेविका विद्यालयाच्या गृहमाता बनल्या! नतर त्यानी स्वतत्र आश्रम स्थापून तो चालविला श्री भणसाळीभाई त्याचे आश्रमात राहिले.

याप्रमाणे मुख्य मुख्य स्त्रीकार्यकर्त्यांचा इतिहास संक्षेपात सागितला अबलेला शक्तिरूपिणी बनविण्याचे मोठें कौशल्य गाधीजींनी देशाला दाखवून दिले.

• •

# २३ चराति चरतो भगः।*

मुखीं विद्या भुजीं वीर्य उदरीं प्रेम साठवे।
पदीं सेवार्थ संचार वर्णरूपास त्या नमो॥

— स्तवराज

गाधीजींनी वर्धा येथील मुक्काम उठवून सेगाव खेड्यात तळ ठोकला तेव्हा वर्धा ते सेगाव पक्की सडक नव्हती वर्ध्यापासून टेकडी-पर्यंत एक गाडीचा रस्ता होता पण तो आश्रमाशी जोडणे शक्य नव्हते. मध्ये लोकाची शेते होती, त्यामुळे सरळ रस्ता बनविता आला नाही. जमनालालजीच्या पडित जमिनीतून तात्पुरता रस्ता तयार करण्यात आला, जो आज देखील मोडक्यातोडक्या दशेंत बाग व गोशाला याना दक्षिणेकडून वळसा घालून गेलेला दिसतो सन १९३६च्या एप्रिल-अखेर गाधीजी सेगाव येथे चारपाच दिवस राहून नतर शरीरस्वास्थ्या-साठी नदी हिलसला रवाना झाले. तेथून ते १५ जूनला वर्ध्यास परतले तोपर्यंत रस्ता तयार झाला होता व तो बनविण्यात मुख्यतः मुन्नालाल-जीचे श्रम कारणीभूत झाले होते. पुढे याच रस्त्याने वाहनाची सेगाव-हून वर्ध्यास रहदारी सुरू झाली गाधीजी सेगावला असले तरी मधून-मधून त्याना वर्ध्यास जावे लागे काँग्रेसच्या कार्यकारी मडळाच्या बैठकी वर्ध्यास होत, शिक्षण परिषद वर्ध्यास भरली होती, आश्रमा-तील कोणी माणसे फार आजारी झाल्यास त्याना वर्धा येथील रुग्णालयात उपचारार्थ पाठवले जाई. अशा प्रसगी गाधीजीना वर्ध्यास जाऊन यावे लागे कधी जमनालालजीची बैलगाडी तर कधी टागा यात बसून ते जा यें करीत पण स्वत त्याना पायी चालत जाणे आवडे. अशा निमित्तानें कार्यकर्त्यांशी सबध येई व त्याना वेळही देता येई. पुढील दोन चित्रे सन १९३६ मधील आहेत एका चित्रात

* चालणाऱ्याचे नशीव त्याचे बरोबर चालू लागते

गांधीजींच्या उजव्या बाजूस अण्णासाहेब दास्ताने व डावीकडे भारतन् कुमारप्पा व प्यारेलाल आहेत. आणखीही ग्रामवासी मंडळी सोबत आहे. दुसऱ्या चित्रांत गांधीजी टांग्यांतून उतरले आहेत. टांग्यांत राजकुमारी अमृतकुँवर दिसत आहेत. त्या अद्याप आश्रमवासी झाल्या नव्हत्या; पण आश्रमवासी होण्यापूर्वी त्या मधून मधून गांधीजींना भेटत व त्यांची कामें करीत.

पुढें कॉंग्रेस मंत्रिमंडळें प्रांतांचा कारभार करूं लागलीं तेव्हां मध्यप्रदेशच्या (त्यावेळीं विदर्भ नागपूरचे आठ जिल्हे मध्यप्रदेशांत प्रविष्ट होते) सरकारनें शेतकऱ्यांकडून जमिनी विकत घेऊन वर्धा ते सेवाग्राम पक्की सडक बांधून दिली. त्यामुळें गांधीजींच्या भेटीस दूरदूरच्या प्रदेशांतून व परदेशांतून येणाऱ्या लोकांना प्रवास सोपा झाला. सडकेवरून मोटरी धांवूं लागल्या! खेड्यांतील लोकांचीही आयती सोय झाली!

रस्ता कच्चा होता तेव्हां पावसाळ्यांत सर्वत्र चिखल होऊन पायीं चालणें किंवा वाहन चालवणें अशक्य होऊन जाई. पक्की सडक झाल्यामुळें रहदारी बारा महिने निर्वेधपणें चालूं लागली. गांधीजींना सकाळ संध्याकाळ फिरण्यासही भरपूर क्षेत्र मिळालें. कार्यकर्त्यांना सोबत घेऊन त्यांना मार्गदर्शन करणें सुलभ झालें!



# २४ बादशाहखान

मेरी आबरू से खेलनेवालो,
तेल पानी से मिल नहीं सकता,
आँधियाँ आयें या कि तूफाँ आयें –
मैं हिमालय हूँ हिल नहीं सकता ।।

सन १९३६च्या म्हणजे सेवाग्राम आश्रमाच्या स्थापनेच्या पहिल्याच वर्षी ऑगस्टमध्यें वायव्य सरहद्द प्रांताचे लोकप्रिय पुढारी अबदुल गफ्फारखान ऊर्फ बादशाहखान यांना गांधीजींनी आपल्या आश्रमांत येऊन राहाण्याचे आमंत्रण दिले व त्याप्रमाणे ते आले. तुरुंगातून सुटका झाल्यावर ते व त्यांचे वडील बंधु डॉ. खानसाहेब यांना इंग्रज सरकारने स्वतःच्या प्रांतात जाण्याची मनाई केली होती. श्री जमनालालजींनी त्यांना वर्ध्यास आपणाकडे येऊन राहाण्याचे आमंत्रण दिले होते व त्याप्रमाणे ते दोघे बंधु वर्ध्यास राहात होते. बादशाहखान तेथूनच सेगांवला येऊन आश्रमात राहिले. आदिनिवासात एका कोपऱ्यात त्यांनी बैठक मारली. त्यांची कन्या महेरताज ही त्यांचें-बरोबर आली होती. खानसाहेब आश्रमातील जीवनाशी एकरूप होऊन गेले होते. भाजी चिरणे, धान्य निवडणे, झाडू मारणे वगैरे सर्व कामें ते स्वहस्ते करीत असत. गांधीजींनी खानसाहेबांना मांस खाण्याची सवलत देऊ केली होती पण आश्रमाच्या मर्यादेचे भान ठेवून खान-साहेबांनी तिचा स्वीकार केला नाही.

आश्रमात कोणी आजारी पडल्यास गांधीजी त्याची सेवा करीत असत. खानसाहेब याही क्षेत्रात मागे राहिले नाहीत. अत्यंत तत्परतेने व काळजीपूर्वक तेही आजाऱ्याची सेवा करीत. त्यांची कन्याही सर्वांशी मिसळून वागे. खानसाहेबांचा साधेपणा म्हणजे एक नमुना होता. फिकट निळ्या रंगाचा पायजमा व सदरा एवढाच त्यांचा पोशाख असे.

त्याच्या हाती झाडू व फावडें ही अवजारे शोभत असत खेड्यातील शेतकऱ्यापेक्षा अधिक उच्च राहाणी त्याना पसत नव्हती

सन १९३६च्या डिसेंबरात कॉंग्रेसचे अधिवेशन फैजपूर येथें होणार होते त्याचे अध्यक्षपद खानसाहेबानी स्वीकारावे यासाठी त्याना विनति करण्यासाठी प. जवाहरलाल व श्री राजेन्द्रप्रसाद सेवाग्रामला गेले होते गाधीजीच्या समोरच दोघानी खानसाहेबाना सूचना केली पण खानसाहेबानी उत्तर दिले, हे माझे काम नव्हे मी फक्त सेवक शिपाई (खिदमतगार सिपाही) आहे मला असल्या कामात गोडी नाही आपण इतर कोणाला तरी अध्यक्ष बनवावे" गाधीजीनी खानसाहेबाच्या म्हणण्याचे समर्थन केले इतकेच नव्हे तर जवाहरलालजीनीच फैजपूर कॉंग्रेसचे अध्यक्षपद स्वीकारावे अशी शिफारस केली जवाहरलालजीना मुकाट्याने कबूल करावे लागले

प्रारभीचे चित्र याच समयीचे आहे राजेन्द्रबाबू व बादशाहखान याचे सभापण चालू आहे

ते हि नो दिवसा गता ।

•

# २५ ग्रहमालेंतील सूर्य

* तस्माद् गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ।
शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ।।

भागवतम् ३-२१

शेजारच्या चित्रात गाधीजीकडे मार्गदर्शनासाठी आलेले खादी कार्यकर्ते दिसत आहेत श्री श्रीकृष्णदास जाजू हे त्या सर्वाच्या मध्यभागी बसले आहेत इग्रजी अमलाच्या काळात खेड्यातील लोकासमोर दोन गभीर समस्या उभ्या होत्या अन्न आणि वस्त्र अन्ननिर्माण करणाऱ्या शेतकऱ्याची परिस्थिति सुधारणे गुलामीच्या काळात फार जड जात होते जमीन व शेतकऱ्याचे कर्ज याचा परामर्श घेण्यास हाती सत्ता नव्हती पण वस्त्राची समस्या उलगडणे तितके कठिण नाही असा गाधीजीना विश्वास होता त्याच्या प्रतिभेला साक्षात्कार झाला व त्यानी चरखारूपी दिव्य साधन राष्ट्रासमोर ठेवले ! चरखा हा ग्रहमालेतील सूर्य कल्पून त्याचे भोवती ग्रामोद्योग, गोसेवा आदि विधायक कार्यक्रम ग्रहाप्रमाणे फिरत राहावे असे गाधीजीनी प्रतिपादन केले चरख्याचा शोध लागल्यानतर अखिल भारतीय चरखा सघ नावाची सस्था कॉंग्रेसच्या ठरावानुसार स्थापन झाली. तिने तालीम देऊन शेकडो कार्यकर्ते तयार केले श्रीकृष्णदास जाजू हे चरखा सघातील ज्येष्ठ कार्यकर्ते होते प्रथम महाराष्ट्र चरखा सघाचे व नतर अखिल भारत चरखा सघाचे ते मत्री बनले होते कातणाऱ्याना किमान मजूरी वाढवून देण्यासाठी चरखा सघानें खूप प्रयत्न केला खादीचा पोशाख हा राष्ट्रीय पोशाख समजला जावा असे वातावरण तयार करण्यात गाधीजीनी यश मिळविले चरख्यानें शेकडो खेड्यातील लोकाना मानाची आजीविका निर्माण करून दिली

---

* म्हणून आपले परम श्रेय जाणू इच्छिणार्यानें शास्त्रात पारगत असलेल्या आणि परब्रह्माचा साक्षात्कार झालेल्या, शातीचे माहेरघर अशा सद्गुरूला शरण जावे

गांधीजी सेवाग्रामला येऊन स्थायिक झाल्यानंतर सहजच चरख्यानेही त्यांच्याजवळ आपले ठाण मांडले. वर्धा जिल्ह्यास लागून असलेल्या चांदा जिल्ह्यात सावली नावाचे खेडें आहे तेथें खादी उत्पादनाचे मोठे केन्द्र निर्माण झाले. गांधीजींचे पुतणे छगनलालभाई यांचे चिरंजीव कृष्णदास गांधी हे त्या केन्द्रात काम करीत होते ते आजारी पडल्यामुळें गांधीजींनी त्यांना सेवाग्रामला बोलावून घेतले त्यांची प्रकृति सुधारल्यावर त्यांना आपणाजवळच राहाण्यास सांगून सेवाग्राममध्यें खादीकार्याचा विकास करण्याचे काम त्यांचेवर सोपवले खादीनें आपले पाय पसरले ! कस्तुरबा रुग्णालयाजवळ खादी-कार्य-कर्तानिवास व खादी-विद्यार्थी-छात्रालय यांची उभारणी झाली. खादी-विद्यार्थी तयार होऊं लागले. पूर्वी श्री शंकरलाल बँकर हे अखिल भारत चरखा संघाचे मंत्री होते व मुख्य कार्यालय अहमदाबाद येथें होते. बँकर आजारी पडल्यामुळें जाजूजी चरखा संघाचे मंत्री बनले, त्यामुळें मुख्य कार्यालय अहमदाबादेहून वर्ध्यास आले व तेथून सेवा-ग्रामला आणण्यात आले

कृष्णदासभाईंचे आईवडील गुजरातेत होते. त्यांना गांधीजींनी १९४०च्या सुमारास सेवाग्राम येथें बोलावून घेतले तेव्हांपासून ती दोघें आश्रमात राहू लागली

सन १९४२ च्या आंदोलनानंतर १९४४ मध्ये गांधीजी सुटून सेवाग्रामला आले त्या आंदोलनकाळात पोलीसांनी ठिकठिकाणच्या खादी भांडारांना आगी लावल्या होत्या व गरीब जनतेचे नुकसान केले होते त्यावरून खादीचे भविष्य हा एक चिंतेचा व चिंतनाचा विषय झाला होता जाजूजींनी गांधीजींशी सात दिवस एकान्त करून मार्गदर्शन मागून घेतले. हा संवाद पुढें "खादीचे नवसंस्करण" या नावानें प्रकाशित करण्यात आला व्यापारी पद्धतीने खादीचा प्रचार करण्या-ऐवजी यापुढें खादी ग्रामाभिमुख व्हावी, स्वावलंबी व्हावी, अशी दृष्टि गांधीजींनी दिली. तशा दृष्टीने प्रयत्न सुरु झाले पण खेदाची गोष्ट ही की, अद्यापपर्यंत ती प्रत्यक्षात येऊं शकली नाही

• •

होते, "अहिंसेने स्वराज्य मिळवायचे म्हणता पण असे एकही उदाहरण इतिहासात नाही मी इतिहासाचा प्रोफेसर आहे. माझ्या मुलांना मी काय शिकवू ?" त्यावर गांधीजींनी उत्तर दिले होते, "होय, तुम्ही इतिहासाचे प्रोफेसर आहा पण मी इतिहासाचा निर्माता आहे. माणसाने इतिहासात नसलेला नवा मार्ग चोखाळू नये असे थोडेच आहे ! मला जगाला दाखवून द्यायचे आहे, पवित्रतम साधनांनी देखील व्यक्ति आणि राष्ट्रें स्वतंत्र होऊ शकतात " पुढे तेच कृपलानी प्रोफेसरची नोकरी सोडून गांधीजींचे पक्के अनुयायी बनले व त्यांनी अनेकदा तुरुंगाच्या वाऱ्या केल्या.

सरदार वल्लभभाई हे देखील सुरुवातीस गांधीजींच्या विचारसरणीची टिंगल करीत नंतर ते त्यांचे अनुयायी बनले ! विद्वानांना शंका फार असतात, पण प्रत्यक्ष आचरण करीत गेल्याने शंका लुप्त होऊन जीवनसत्याचा साक्षात्कार होतो.

• •

पर्यंत एकही विषय त्यानी सोडला नाही. पुढे गाधीजीनी त्याना स्वत:च्या आश्रमात येऊन राहाण्याचे आमत्रण दिले तेव्हा काकासाहेबानी त्यांना सागितले, "मी अध्यात्मसाधनेचा माणूस! हिमालयातून नुकताच आलेलो आहे. पण तुमच्या अहिंसेने देश स्वतत्र होऊ शकेल असा विश्वास मुळीच वसत नाही. अहिंसेविषयी मला नितान्त आदर आहे पण स्वराज्य मिळविताना अहिंसेचे बंधन मी स्वीकारायला तयार नाही. अशाला तुम्ही आश्रमात घ्याल का?" यावर गाधीजी म्हणाले, "तुझे विचार मी समजू शकतो. जग तुझ्या बाजूचे आहे, मी अल्पमतामध्ये आहे. तुला आश्रमात नाही घ्यायचा तर मला माणसेच कुठून मिळतील? तू आश्रमात येऊन रहा. माझे विचार, माझी कार्यपद्धति समजून घे. आश्रमजीवन तुला मान्य आहे वाटेल तितके दिवस रहा. मी तुझे पख कापू इच्छीत नाही माझ्या गोष्टी न पटल्या तर केव्हाही निघून जा किंवा सोडून दे. कसल्याच बधनात तुला घालू इच्छीत नाही." यानतर काकासाहेब आश्रमात जाऊ लागले. काही कालानतर तेथे ते कायमचे स्थायिक झाले गाधीजीच्या सान्निध्यात राहिल्यावर त्याच्यात परिवर्तन होत गेले व त्याना अहिंसेचा साक्षात्कार होऊन ते 'दीक्षित' झाले!

काकासाहेबानी आपले जीवश्च कण्ठश्च मित्र आचार्य कृपलानी यानाही तार करून बोलावले तेही प्रथम अहिंसेबद्दल शकेने बोलत. पण पुढे त्याचाही विश्वास अहिंसेवर बसला.

कृपलानी व काकासाहेब दोघेही एकामागून एक गुजरात विद्यापीठाचे आचार्य झाले. सन १९३०-३३ च्या चळवळीनतर काकासाहेबानी गुजरात सोडून वर्ध्याचा आश्रय घेतला. गाधीजीनी त्याना राष्ट्रभाषा हिंदी-हिंदुस्तानीचा प्रचार करण्याचे काम सोपवले. ते त्यांनी उत्तम प्रकारे केले. गाधीजी सेगावला स्थायिक झाले तेव्हा काकासाहेब वर्धा येथील महिला-आश्रमासमोर काकावाडीत जाऊन राहिले तेथून ते वेळोवेळी गाधीजींना भेटून विचारविनिमय करण्यास येत. समोरचे चित्र अशाच एका प्रसंगाचे आहे.

काकासाहेबाचा पिंड शिक्षकाचा व साहित्यिकाचा आहे. कृपलानीचा राजकारणी पुरुषाचा आहे. त्यानी गाधीजीना म्हटले

# २७ अहिंसा परमो धर्मः ।

मोक्षेण अरसिकेन किम् ! *

– श्री. शांतिदेवाचार्य (एक बौद्ध अर्हत)

सन १९३३ त एक जपानी साधु निचिदात्सु फूजीई वर्धा येथें गांधीजींना भेटले होते काही दिवस ते गांधीजींच्या सहवासात राहिले स्वदेशी परत गेल्यावर त्यांनी आपले दोन शिष्य गांधीजींकडे पाठवले एकाचे नाव मारुयामा सान व दुसऱ्याचे साटो होते सेवाग्राम आश्रमात राहू लागल्यावर त्या दोघांना हिंदी नावे देण्यात आली – आनंद व केशव भिक्षु आनंद यांना बुद्धमंदिराबाबत काही कामें करावयाची होती त्यामुळें ते येथे फार काळ राहू शकले नाहीत, भिक्षु केशव राहिले आश्रमाचे नियम ते काटेकोरपणें पाळीत व खप काम करीत असत रोज सकाळी व सायंकाळी प्रार्थनेपूर्वी ते आपला ढोलपखा हातात घेऊन त्यावर ताल ठोकीत, तोंडाने "ॐ नम्यो हो रेंगे क्यो !" हा मंत्र मोठ्याने म्हणत रस्त्यावर फिरत असत एकदा ते रस्त्याने भजन करीत चालले असताना एका वेड्यानें त्यांचेवर हल्ला केला व त्यांना खूप बडवले भिक्षु केशव चांगले मजबूत बांध्याचे व बळकट असूनही त्यांनी प्रतिकार केला नाही, आपले भजन त्यांनी चालू ठेवले सडकेवरचे इतर लोक धावून आले व त्यांनी त्या वेड्यापासून त्यांची मुक्तता केली !

दुसरे महायुद्ध सुरू झाले व जपानने युद्धात प्रवेश करून हिंदुस्थान सरकारशी शत्रुत्व पत्करताच, तत्कालीन भारत सरकारने केशवना पकडून कैदेंत ठेवले युद्ध संपल्यावर भिक्षु केशवची रवानगी जपानला करण्यात आली तरी त्यांची निष्ठा गांधीजीबद्दल इतकी उत्कट होती की, गांधीजींचा खून झाल्याचे ऐकताच भिक्षु केशव बेशुद्ध पडले ! शुद्धीवर आल्यावर त्यांनी मौन स्वीकारले !

* अरसिक मोक्ष घेऊन काय करू ?

# २८ आश्रमांत टेलीफोन!

आधीं कर्माचा प्रसंग । कर्म केलें पाहिजे सांग ।
कदाचित पडलें व्यंग । तरी प्रत्यवाय घडे ।।

– दासबोध ११-९-१.

गांधीजी खेड्यात येऊन राहिले ते खेडवळाच्या जीवनाशी एकरूप व्हावे म्हणूनच राहिले. पण खेडवळाची सेवा करिताना त्याचे दोष अंगी आणणे योग्य नव्हे खेड्यातील लोकात अज्ञान असते, अस्वच्छता असते, आळस असतो, ईर्ष्या-असूया आदि असतात हे सर्व दोष आपल्या जीवनात आणू द्यावयाचे नाहीत, परंतु जीवन साधें, कमीत कमी खर्चाचे व शरीरश्रमावर आधारलेले असावे असा गांधीजींचा प्रयत्न होता. त्यांनी आश्रमात वीज आणू दिली नाहीं विजेचे दिवे किंवा पंप त्यानी बसवून घेतले नाहीत विहिरीचे पाणी मोटेने काढले. जाई एकदा मध्यप्रातातील हॉस्पिटलाचे मुख्य अधिकारी श्री हुकूमतराय आश्रमात आले असता, त्यांनी पाहिले की, आदिकुव्यावर चाललेल्या मोटेच्या दोरामुळे जमिनीवरील धूळ व शेण वगैरे घाण पदार्थ विहिरीच्या पाण्यात पडून पाणी अस्वच्छ होत आहे त्यानी पर्शियन चक्र लावून विहिरीचे पाणी उपसण्याची शिफारस केली व त्यासाठी लागणारा खर्च स्वत दिला त्यानतर श्री रामदासभाई गुलाटी यानी विहिरीवर पाण्याचे बंद टाके बांधले व त्याच्या खिडकीवर एक जाळी लावली त्यामुळें आत डास किंवा माशा याना प्रवेश बंद झाला

पुढें आश्रमात आणखी एक नवीन "सुधारणा" आली. तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो याचा गांधीजींशी निकट संबंध वाढत होता. गांधीजींचे ताजे विचार आपणास माहीत व्हावे म्हणून त्यानी 'हरिजन' हे नियतकालिक नेमाने आपणास मिळावे अशी व्यवस्था केली होती. तरी देखील जरूर पडल्यास त्याचेशी तावडतोब संपर्क साधणे

समोर दोन चित्रे दिली आहेत सेवाग्रामच्या आश्रमात गाधीजीना भेटावयास येणाऱ्यात चिनी लोकही असत एका चित्रात गाधीजी एका चिनी गुरूशी बोलत आहेत दुसऱ्या चित्रात दूर कॅथेहून आलेल्या चिनी बौद्ध मिशनचे सदस्य बापूकुटीच्या फाटकाबाहेर पडताना दिसत आहेत. सोबत महादेवभाईही आहेत भगवान् बुद्धाने अहिंसेचा महान् आदर्श आपल्या शिष्यासमोर ठेवला होता अहिंसेशिवाय चित्त शुद्ध व शात होत नाही व निर्वाणप्राप्तीसाठी तर चित्तातील सर्व कल्मष दूर होणे आवश्यक आहे हे सर्व बौद्ध भिक्षु आपल्या धर्मावर पूर्ण निष्ठा ठेवणारे खरे, पण त्याच वेळी चीन व जपान यात वैर सुरू झाले होते जपान चीनचे लचके तोडीत होता पण तोडाने "आम्हाला चीनची सास्कृतिक पातळी उचावर नेऊन त्याचेशी सख्य जोडावयाचे आहे," असे म्हणत होता जपानी भिक्षु आपल्या राष्ट्राच्या भूमिकेवर विश्वास ठेवीत केशव भिक्षुही उघड म्हणत की, "जपान चीनची सेवाच करीत आहे व त्याला सुधारू इच्छीत आहे" चिनी साधूना स्वदेशात शाति नादावी असे तर वाटेच पण जपानचा प्रतिकार करणेही आवश्यक वाटे भगवान् बुद्धाच्या उपदेशाला जुळवून ही गोष्ट अमलात कशी आणावी याचा विचार करताना त्याना गाधीजीना भेटून त्याचे मार्गदर्शन घ्यावे असे वाटले व म्हणून ते गाधीजीना भेटावयास आले होते चीनचा सेनानी मार्शल च्याग कै शेक त्यावेळी जपानशी तुबळ युद्ध करीत होता जनता त्याला साथ देत होती अशा परिस्थितीत गाधीजीनी चीनला कसलाही 'सदेश' देणे नाकारले, पण अहिंसेच्या साधनाबाबत सामान्य चर्चा भेटीस आलेल्या चिनी सज्जनाशी केली

जीवन म्हणजे कसोटी आहे धर्माची शिकवण प्रत्यक्ष क्रियेत उतरली नाही तर मानसिक विकृति व नैतिक अध पात होण्याचे भय असते. पण तशी ती उतरण्यास आध्यात्मिक आदर्शावर सपूर्ण निष्ठा असावी लागते गाधीजीची निष्ठा पक्की होती म्हणूनच त्याचे चारित्र्य शेवटपर्यंत उज्ज्वल राहिले !

• •

# २८ आश्रमांत टेलीफोन!

आधीं कर्माचा प्रसंग। कर्म केलें पाहिजे सांग।
कदाचित पडले व्यंग। तरी प्रत्यवाय घडे ।।

— दासबोध ११-९-१.

गाधीजी खेडयात येऊन राहिले ते खेडवळाच्या जीवनाशी एकरूप व्हावे म्हणूनच राहिले पण खेडवळाची सेवा करिताना त्याचे दोप अगी आणणे योग्य नव्हे खेडयातील लोकात अज्ञान असते, अस्वच्छता असते, आळस असतो, ईर्ष्या-असूया आदि असतात. हे सर्व दोप आपल्या जीवनात आणू द्यावयाचे नाहीत, परतु जीवन साधे, कमीत कमी खर्चाचे व शरीरश्रमावर आधारलेले असावे असा गाधीजीचा प्रयत्न होता. त्यानी आश्रमात वीज आणू दिली नाही विजेचे दिवे किंवा पप त्यानी बसवून घेतले नाहीत विहिरीचे पाणी मोटेने काढले जाई एकदा मध्यप्रातातील हॉस्पिटलाचे मुख्य अधिकारी श्री हुकूमतराय आश्रमात आले असता, त्यानी पाहिले की, आदिकुव्यावर चाललेल्या मोटेच्या दोरामुळे जमिनीवरील धूळ व शेण वगैरे घाण पदार्थ विहिरीच्या पाण्यात पडून पाणी अस्वच्छ होत आहे. त्यानी पर्शियन चक्र लावून विहिरीचे पाणी उपसण्याची शिफारस केली व त्यासाठी लागणारा खर्च स्वत दिला त्यानतर श्री रामदासभाई गुलाटी यानी विहिरीवर पाण्याचे बद ढाके बाधले व त्याच्या खिडकीवर एक जाळी लावली त्यामुळें आत डास किंवा माशा याना प्रवेश बद झाला

पुढे आश्रमात आणखी एक नवीन "सुधारणा" आली. तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो याचा गाधीजीशी निकट सबध वाढत होता गाधीजीचे ताजे विचार आपणास माहीत व्हावे म्हणून त्यानी 'हरिजन' हे नियतकालिक नेमाने आपणास मिळावे अशी व्यवस्था केली होती तरी देखील जरूर पडल्यास त्याचेशी तावडतोब सपर्क साधणे

शक्य व्हावे यासाठी आश्रमात टेलीफोन असावा असा आग्रह त्यांनी धरला. गांधीजींनी इतर कोणाचेही या बाबतीत ऐकले नसते पण व्हाइसरॉयचे मन त्यांना मोडवेना. त्यांनी संमति दिली व आश्रमात टेलीफोन आला !

समोरचे चित्र गांधीजी फोनवर बोलत असताना घेतलेले आहे. देशाचे राजकीय पुढारी बनल्यावर जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी अर्वाचीन यंत्रसामग्रीचा थोडा फार उपयोग करणे त्यांना भागच पडत होते. लिहिण्यासाठी ते प्रथम बोरूचा उपयोग करीत असत. पण त्यांच्या अखंड लेखनप्रवाहाचा भार बोरूंना सहन होईना तेव्हा नाईलाजाने त्यांना फाउंटनपेनचा स्वीकार पुनश्च करावा लागला असे त्यांचे प्रयोग व प्रयत्न सतत चालत

# २९ कसोटीचे प्रसंग

सांकडीमध्यें वर्तो जाणे । उपाधीमध्यें मिळों जाणें ।
अलिप्तपणें राखों जाणें । आपणांसी ।।

– दासबोध.

गाधीजी खेडचात राहिले तरी ते देशाचे पुढारी असल्यामुळे त्याना एकान्त व शाति मिळत नसत आश्रमात नाना प्रातातील विविध भाषा बोलणारी, विविध दर्जाची व शैक्षणिक पातळीची माणसे येऊन राहिल्यावर त्या सर्वात मधून मधून कुरबुरी होणे अपरिहार्य होते. गाधीजी सर्वाना साभाळून घेत. सत्पुरुषाजवळ गुन्हेगार व वेडे हेही येत असतात कारण त्याना आपल्या पापाचे क्षालन करावयाचे असते मानसिक विकृति सुधारावयाची असते गाधीजी न कटाळता अशाचीही सेवा करीत. परतु गाधीजीना धक्का देणारे प्रसगही वारवार घडत सरदार पृथ्वीसिग या दहशतवादी कार्यकर्त्यासाठी गाधीजीनी सरकार दरबारी खूप खटपट केली पोलीसाना चुकविण्यासाठी पृथ्वीसिग धावत्या गाडीतून उडी मारून पसार झाले होते व छद्मवेषाने देशात राहात होते. पुढे गाधीजीना भेटून त्याच्या सल्ल्याने ते सरकारच्या आधीन झाले. त्याना पजावमध्ये कैदेत ठेवण्यात आले. आपण अहिंसानिष्ठ झाल्याचे त्यानी जाहीर केले एक वर्षानतर गाधीजीच्या विनतीवरून पजाब सरकारने त्याना मध्यप्रात सरकारकडे पाठवून दिले. मध्यप्रातात कांग्रेस सरकार होते. त्याने पृथ्वीसिगाना मुक्त करून गाधीजीच्या हवाली केले. आश्रमात ते काही दिवस राहिले. नतर देशातही मधून मधून फिरले. पुढे दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर काही निमित्तावरून त्यानी गाधीजीशी मतभेद जाहीर केला व त्याचा त्याग केला.

सुरेन्द्रनाथ नावाच्या एका बगाली दहशतवाद्यासही गुप्त पोलीसाच्या करडचा नजरेतून गाधीजीनी सोडविले व वर्धा सोडून जाणार

नाही या सरकारी अटीवर त्याला आश्रमात ठेवून घेतले. तो गाधीजीना शरण आला होता म्हणून गाधीजीनी अभय देऊन त्याला १९४० च्या सुमारास आश्रय दिला एखादे वर्ष आश्रमात काढल्यावर कोठल्याही प्रकारची पूर्वसूचना न देता तो एके दिवशी आश्रमात गडबड करून पळून गेला. गाधीजीनी, आणखी एका बगाली युवकाची पोलीसाच्या हातून सुटका केली होती ती घटना सन १९३८ ची होती.

याप्रमाणे दीन, दु खी, विपद्ग्रस्त, रोगी व भयग्रस्त अशा सर्वांचा परामर्श घेत, खेड्यातील जनतेच्या उद्धाराची स्वप्ने सेवीत, गाधीजी आपली तपोमय सेवा दिवसेदिवस उज्ज्वल करीत होते.

आशादेवी आर्यनायकम् याना आनद नावाचा एक छोटा मुलगा होता व त्याहून थोडी मोठी एक मुलगी होती हो दोन अपत्ये त्याना जीव की प्राण असत. महायुद्ध सुरू झाल्यानतरची ही घटना आहे (१९ डिसेबर १९३९) आश्रमातील लोक बनकरीच्या विहिरीजवळ बसून हुरडा खात होते श्री जमनालालजीही त्यात होते आनदही हुरडा खात होता. एकाएकी तो बेशुद्ध पडला! सारे लोक घाबरले! तो शुद्धीवर येण्याचे चिन्ह दिसेना तेव्हा गाधीजीना बोलावणे गेले. गाधीजीजवळ एका अमेरिकन वार्ताहराने भेट मागितली होती व त्याला ते आत बोलावणार होते तोच हे बोलावणे आले! त्या बातमीदाराला जरा थाबण्याची विनति करण्यास महादेवभाईना सागून गाधीजी वेगाने आनदला पहाण्यास गेले आशादेवी त्याला माडीवर घेऊन बसल्या होत्या! त्याचे वडील बाहेरगावी गेले होते तो मुलगा शुद्धीवर आलाच नाही नतर कळले की त्याने पेपरमिटच्या गोळ्या समजून क्विनाईनच्या ६० गोळ्या खाल्ल्या होत्या. गाधीजीनी व डॉ सुशीला नायरनी खूप उपचार केले पण उपयोग न होता तो मुलगा निवर्तला! गाधीजीना आपले मन शात ठेवून आशादेवीचे सात्वन करावे लागले. आश्रमात मृत्यूची ही पहिलीच घटना झाली होती! त्या परिस्थितीतहि गाधीजी त्या अमेरिकन बातमीदाराला विसरले नाहीत तेथील काम आटोपल्यावर ते तसेच परत आले व बातमीदाराला बोलावून त्याच्या प्रश्नाची उत्तरे देऊ लागले. त्या क्षोभजनक करुण

घटनेचा थोडाहि परिणाम त्यावेळी त्याच्या चेहऱ्यावर दिसला नाही. वातमीदाराने जागतिक परिस्थितीबद्दल प्रश्न विचारला. त्यावर ते म्हणाले, "मी कूपमंडूक आहे माझ्यापुरते सारे विश्व भारतात आणि सेवाग्रामात सामावले आहे माझ्या सहकाऱ्यापैकी (वर्किंग कमिटीतील) कित्येक जण जागतिक घटनाचा अभ्यास करितात, तसा मी करीत नाही."

अशाच पद्धतीने त्यानी त्याच्या प्रश्नाची उत्तरे दिली. शेवटी त्यानी विनोदही केला! बातमीदाराने पाहिले की, आश्रमातील वातावरण खिन्न व उदास होते तरी गाधीजी स्वतः हसून त्यालाही हंसवीत होते!

समोरच्या फोटोत बातमीदाराशी गाधीजीचे बोलणे चालू आहे.



# ३० संत-परीस

आधींच शिकोनि शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी ।
गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ।।

–दासबोध

सेगावला आल्यावर सुमारे एक महिन्यानतर नागपूरचे श्री बाबूराव हरकरे याच्या शिफारशीवरून गाधीजीनी विदर्भातील राष्ट्रीय संत म्हणून नावाजलेले श्री तुकडोजी महाराज याना एक महिनाभर आपल्या आश्रमात ठेवून घेतले होते. त्यावेळी फक्त आदिनिवास बाधून झाला होता गाधीजी स्वत: त्यात राहात व पाहुण्याना देखील आपल्या जवळच ठेवून घेत. तुकडोजी महाराजाचे सोबतीस नारायण नावाचा सेवक होता, तोही तेथेंच राहिला ! तुकडोजी महाराजाना सूत कातता येत होते पण पिंजणे व पेळू बनविणे येत नव्हते. या दोन्ही कला त्यानी आश्रमात शिकून घेतल्या व मोझरी येथें आपल्या आश्रमात गेल्यावर त्यानी गाधीजीजवळ शिकलेल्या कला आपल्या शिष्यवर्गासही दिल्या. गाधीजीच्या रचनात्मक कार्यक्रमातील अठरा प्रवृत्तीपैकी बऱ्याच प्रवृत्ति त्यानी आपल्या आश्रमात सुरू केल्या. शेती, गोशाळा, विद्यार्थ्यांचे वसतिगृह, खादी उत्पादन, रुग्णालय, मूलोद्योगी शिक्षण आदि अनेक कामें सुमारे अठरा वर्षात उभी केली ! सेगावला असताना रोज सायकाळी प्रार्थनेनतर ते भजन करीत. ते ऐकण्यास शेंकडो लोक गोळा होत.

समोरच्या चित्रात आदिनिवासच्या पडवीत बसून गाधीजी एका कार्यकर्त्याशी बोलत आहेत. जवळच प्यारेलाल टिप्पणे घेत आहेत व त्याचे शेजारी तुकडोजी महाराज बसले आहेत.

सरदार वल्लभभाई गाधीजीच्या परिवाराला कधीकधी विनोदानें "पाजरापोळ" म्हणत असत. नाना प्रकारची माणसे त्यात असत.

अशाच पैकी एक श्री भणसाळी हे होते. इंग्लंडमध्यें शिकून आलेले व एका काळी अहमदाबाद जवळील राष्ट्रीय गुजरात विद्यापीठाचे प्रोफेसर असूनही ते अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. जैन पद्धतीप्रमाणे त्यांनी चाळीस व पंचावन्न दिवसांचे उपवास केले होते, तुरुंगातही जाऊन आले होते. नंतर त्यांना वैराग्य उपजले व ते जवळजवळ विवस्त्र स्थितीत पृथ्वीसंचार करूं लागले, अरण्यातही भटकत राहिले व मौन पक्के करण्यासाठी त्यांनीं आपले ओठ एका पितळी कडीनें शिवून घेतले! अशाही लोकविलक्षण व्यक्तीला गांधीजींनी आपल्या सेवाग्रामच्या आश्रमात ठेवून घेतले हळू हळू त्यांनी भणसाळीभाईच्या मनातील विकृति दूर केली, ओठ मोकळे करवले आणि त्यांना कर्मयोगात गोडी लावली ते पुढें रोज सतरा तास काम करूं लागले! भणसाळीभाई माणसांत आल्यावर कपडे वापरू लागले तरी त्यांचे वैराग्य कायम होते. पुढें गांधीजी आगाखानमहालात नजरकैदेत असतांना अष्टी-चिमूरच्या अत्याचाराविरुद्ध भणसाळीभाईनी त्रेसष्ठ दिवसांचा उपवास केला व सरकारकडून न्याय मिळविला!

श्री विनोबा भावे यांचे धाकटे बंधु बाळकोबा हे साबरमती येथील आश्रमात होते. पुढें त्यांना क्षयरोग लागू झाला. सन १९३६ च्या नोव्हेंबरात बाळकोबा हे सेवाग्रामपासून दीड मैलावर असलेल्या वरोडा खेड्यात राहावयास आले मीराबहनने तेथें एक झोपडी बांधली होती, तीत ते राहू लागले गांधीजींनी त्यांच्या सेवेसाठी तरतूद करून दिली. रोज फिरावयास जातांना ते बाळकोबांना भेटत, त्यांच्या आहार-निद्रा-शौच वगैरे सर्व तपशीलाची बारकाईने चौकशी करीत व उपचार करवीत सन १९३१ मध्यें बाळकोबा आजारी पडले होते. आजारातून अशक्तपणा व त्यातून फुफ्फुसात क्षयाचा प्रादुर्भाव झाला. अनेक वर्षे ते जागोजाग फिरले. सेवाग्राम येथेंच ते १९४५ पर्यंत राहिले. तेथेंही निवास मधूनमधून बदलीत असत. सन १९४५ नंतर पुण्यात डॉ. दिनशा मेहता यांचेकडे ६ महिने राहिल्यावर त्यांचा आजार पूर्ण बरा झाला व नंतर ते उरळीकांचन

येथें राहिले. तेथें राहून त्यानी निसर्गोपचार आश्रमाची नेत्रदीपक वाढ केली !

संत तुकारामांची उक्ति गांधीजीना साजते : –

थोरीव सांडीली आपुली परीसें । नेणें शिवों कैसें लोखंडासी ।।
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारें ।।

• •

# ३१ किशोरलालभाओी

आपुला तो देह आम्हां उपेक्षित ।
कोठें जाऊं हित सांगों कोणा ।।
कोण नाहीं दक्ष करितां संसार ।
आम्हीं हा विचार वमन केला ।।
– तुकाराम

गाधीजी सेगावला आले त्यासमयी श्री किशोरलाल मशरूवाला हे वर्ध्यास राहात असत किशोरलालभाई मूळ अकोल्याचे. गुजरात विद्यापीठाचे महामात्र म्हणून त्यानी काही वर्ष काम केले होते. ते तुरुंगातही जाऊन आले होते प्रथमपासून त्याची वृत्ति विरक्त व परमार्थपर होती ईश्वरदर्शनाच्या उत्कट इच्छेने एकदा त्यानी गृहत्याग करून एकान्तवास पतकरला होता. तेथें श्री केदारनाथ यानी त्याची सोबत केली व केदारनाथाच्या शिकवणुकीतून त्याना शाति मिळाली म्हणून ते केदारनाथ ऊर्फ नाथजी याना गुरु मानू लागले. किशोरलालभाईंनी अनेक विचारप्रवर्तक पुस्तके लिहिली. त्याना दमा होता. वय वाढत गेले तसा दमाही फार पीडा देऊ लागला. त्यामुळें त्याचे हातून लेखन व विचारप्रवर्तक मार्गदर्शन या पलीकडे अधिक काम होऊ शकेना. अशक्त प्रकृति व दम्याची असह्य पीडा अशा परिस्थितीतही त्याच्या मनाची शाति व समतोल वृत्ति या ढळल्या नाहीत. तें विवाहित होते तरी पत्नी श्री गोमतीबहेन याच्या सहकार्यामुळे त्यानी ब्रह्मचर्यव्रत अनेक वर्षापासून चालू ठेवले होते. आपल्या शरीरसुखाकडे त्यानी कधीच पाहिले नाही शरीराची उपेक्षा व ससारावर तिलाजलि देऊन ते गाधीजीच्या कामात वर्षानुवर्षे पूर्ण सहयोग देत राहिले. पत्नीही त्याना शोभेशीच मिळाली होती.

देशात कायदेभगासाठी वातावरण तयार होत असताना महादेवभाईची प्रकृति बरीच ढासळली. त्याना रक्तदाबाचा आजार जाणवू

लागला. तेव्हा गांधीजींनी त्यांना काही काळ सिमला येथें राजकुमारी अमृतकौर यांचेकडे विश्रांतिसाठी पाठवले होते. पुढें सन १९४० मध्यें प्यारेलाल तुरुंगात गेले तेव्हा त्यांच्या जागी पत्रव्यवहाराच्या कामात मदत करण्यासाठी गांधीजींनी किशोरलालभाईंना सेवाग्रामला बोलावून घेतले गोमतीबहेनसह ते आले त्यावेळी सुरुवातीस त्यांना खादीकार्य-कर्तानिवासमध्यें राहाण्याची सोय करून देण्यात आली नंतर त्यांचे-साठी स्वतंत्र घर बांधले गेले

सुरुवातीच्या चित्रात बापूकुटीत गांधीजी धनुष्तकलीवर सूत कातीत आहेत व शेजारी किशोरलालभाई लिहीत बसले आहेत गांधी-जींचा पत्रव्यवहार ते सांभाळीत होते गांधी-सेवा-संघाची स्थापना झाल्यावर सुरुवातीस जमनालालजी त्यांचे अध्यक्ष होते नंतर संघाचे ध्येय व आपले जीवन यांत विसंगति दिसू लागल्यामुळें जमनालालजी-नी अध्यक्षपद सोडले व आचार-विचारांत संगति, श्रेष्ठ चारित्र्य आणि गांधी-तत्त्वज्ञानाची पक्की बैठक या गुणांनी युक्त अशा किशोरलाल-भाईंची अध्यक्षपदावर निवडणूक झाली पाच वर्षे त्यांनी अध्यक्ष-पदाची व संघाची शोभा वाढवली! नंतर गांधीजींशी मतभेद होऊन त्यांनी १९४०च्या मलिकान्दाच्या संमेलनात अध्यक्षपदाचा राजीनामा दिला त्यानंतर गांधीजींनी संघाचे विसर्जन केले!

• •

# ३२ महिला-आश्रम

झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग ।
उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ।।

— तुकाराम

वर्धा येथे जमनालालजींचे वडिलार्जित घर होते. त्याची मालगुजारी व जिनिंगचा धदा तेथेच चाले त्यामुळें त्याचे वर्धा येथे कायम वास्तव्य होते. तरुणपणीच त्याना देशभक्तीचे सस्कार मिळाले. तो काळच तसा होता जमनालालजींच्या अगी सत्यनिष्ठा होती. त्याच्या धंद्यात सुद्धा ते प्रामाणिकपणे वागत असत त्यामुळे गाधीजीकडे देशाचे नेतृत्व येताच जमनालाल ी त्याचेकडे आकर्षित झाले व आपणास स्वत चा पाचवा पुत्र मानण्याबद्दल त्यानी गाधीजीना विनति केली.

साबरमती येथे गाधीजींनी आश्रम उभारताच जमनालालजींनी तेथे आपल्यासाठी एक घर बाधविले व आश्रमास मासिक मदत सुरू केली वर्धा येथेंही एक आश्रम स्थापावा अशी त्याची इच्छा होती. त्यासाठी त्यानी लायक कार्यकर्त्याची मागणी केली गाधीजींनी विनोबाना पाठवून दिले विनोबासाठी जमनालालजींनी सेगावच्या वाटेवर एक इमारत बाधून दिली. तेथें विनोबा आपल्या सोबत्यासह राहू लागले. सुरुवातीस एकूण सातजण होते सन १९२१ मध्ये आश्रम सुरू झाला. पुढें त्यातील सेवकाची सख्या व कीर्ति वाढत गेली.

सन १९३३ साली साबरमतीचा आश्रम बद झाल्यावर तिकडील मुलींना घेऊन श्री लक्ष्मीबाई खरे या वर्ध्यास गेल्या. विनोबाजींच्या देखरेखीखाली कन्याश्रम सुरू झाला पुढें त्याचेच रूपातर महिलाश्रमात झाले. महिला-आश्रम सस्था बरीच वाढली व विनोबाजींच्या आश्रमाजवळच महिला-आश्रमाच्या इमारती उभारल्या गेल्या.

गांधीजी सेवाग्रामला राहावयास गेल्यावर त्यांच्या जयन्तीच्या दिवशी म्हणजे दर वर्षी ऑक्टोबर दोन रोजी महिला-आश्रमातील विद्यार्थिनी सेवाग्रामची सफाई करण्यास जात असत. समोर दिलेले दोन फोटो या प्रसंगीचे आहेत बहुधा १९४० साल असावे. पहिल्या फोटोत विद्यार्थिनी दोन रांगांनी उभ्या आहेत. त्यांच्या पायाजवळ सफाईची साधनें व्यवस्थित ठेविली आहेत पलीकडे सेवाग्राम खेड्यातील झोपड्या दिसत आहेत गांधीजी विद्यार्थिनींची पहाणी करीत आहेत

दुसरा फोटो बा-कुटीतील बैठकीचा आहे. पडवीत गांधीजी बसून समोर बसलेल्या विद्यार्थिनींना उपदेश करीत आहेत. गांधीजींच्या आसपास महिला-आश्रमाचा संचालकवर्ग व शिक्षिकावर्ग आहे. जवाहरमल गुलराजानी हे आचार्य, वासंतीबहन राय या गृह-व्यवस्थापिका, कमलाबाई लेले व मालनीबाई थत्ते या शिक्षिका, व दामोदरदास मुंदडा हे संस्थेचे मंत्री एवढी मंडळी बसली आहे. गांधीजींच्या जवळ शांताबहन रानीवाला बसल्या आहेत. त्यांच्याच दौलतीतून महिला-आश्रमाची स्थापना सुरुवातीस झाली. अर्थात् प्रेरणा संपूर्णपणे जमनालालजींची होती

• •

# ३३ कायदेभंग

स्वातंत्र्याचा पाइक निधडा,
गरिबांचा कैवारी उघडा ।
सत्याचा मूर्तिमंत पुतळा
घेउनि हातीं शिर ।।

— प्रभाकर दिवाण

महायुद्ध सुरू झाल्यानंतर इंग्रज राज्यकर्त्यांच्या बेजबाबदार राजनीतीमुळे काँग्रेसला सरकारशी असहकार पुकारावा लागला. आठही प्रांतांतील काँग्रेस मंत्रिमंडळांनी राजीनामे दिले. व्हाइसरॉयशी अनेक वेळा बोलणी होऊन देखील इंग्रज सरकार देशास स्वातंत्र्याचे आश्वासन देईना; उलट देशातील काँग्रेस-व्यतिरिक्त इतर राजकीय संस्थांनी दिलेल्या संमतीचा जगांत प्रचार करून हिंदुस्थान युद्धाला अनुकूल आहे, असा दावा करू लागले; तेव्हा गांधीजींनी लाक्षणिक विरोध जाहीर करण्याकरिता वैयक्तिक कायदेभंगाच्या रूपानें सत्याग्रहास सुरुवात केली. त्यासाठी सबंध देशांतून प्रथम-वीर म्हणून त्यांनी विनोबा भावे यांची निवड केली व त्यांना सूचना देण्यासाठी आपणाकडे बोलावून घेतले.

विनोबा त्यावेळी वर्ध्यापासून पांचसहा मैलांवर असलेल्या पवनार खेड्यांत राहात होते. गांधीजींच्या आज्ञेप्रमाणे ते सेवाग्रामला हजर झाले. समोरच्या फोटोंत त्या दोघांची भेट दिसून येत आहे. गांधीजींनी बोलावण्याचा उद्देश त्यांना कळवितांच ते म्हणाले, "तुमची आज्ञा म्हणजे देवाज्ञाच आहे असे मी मानतो."

ता. १७ ऑक्टोबर १९४० रोजी विनोबांनी सरकारला पूर्व-सूचना देऊन कायदेभंग केला. महायुद्धास विरोध दर्शवावा व सरकारला युद्धासाठी मदत करू नये असा प्रचार प्रजेंत करावा, हें कायदेभंगाचे

रूप होते. विनोबांनी प्रथम पवनार येथें व्याख्यान देऊन कायदेभग केला व नतर तीन दिवस पायी निरनिराळ्या खेड्यात जाऊन व्याख्याने दिली ता २१ ऑक्टोबर रोजी त्याना पकडण्यात आले व तीन महिन्याची सजा झाली.

नतर कायदेभगाचे सत्रच सुरू झाले गाधीजीनी प्रथम काही माणसे निवडली, पण नतर प्रजेचे निवडून आलेले प्रतिनिधिच तुरुंगात पाठवले केवळ युद्धविरोधी घोषणा देऊन कायदेभग करण्यात येऊ लागला. जवाहरलालजीना मात्र सरकारनें विनोबानतर ३१ ऑक्टोबर रोजी पकडले ते सेवाग्राम येथें गाधीजीना भेटून परत चालले होते व विनोबानतर त्यानी ७ नोव्हेंबर रोजीं कायदेभग करावा असे गाधीजीनी त्याना सागितले होते त्याना त्याच्या पूर्वीच्या एका भाषणाबद्दल चार वर्षांची सजा ठोठावण्यात आली

कायदेभगाच्या आदेशाचे मुख्य कार्यालय सेवाग्राम येथेच राहिले. गाधीजीना कॉंग्रेसने सेनानीचे अधिकार दिले होते. कायदेभग करू इच्छिणाऱ्याचे माहितीअर्ज त्याच्या त्याच्या प्रातिक कॉंग्रेसच्या कचेऱ्यामार्फत गाधीजीकडे येत व त्याची मजूरी मिळाल्यावरच कायदेभग केला जाई याप्रमाणे एक वर्ष निघून गेले

• •

# ३४ ये यथा मां प्रपद्यन्ते

**असोत तुज आमुचीं सकल भाविकायुर्वळें ।।**

**– मोरोपंत**

पुढच्या फोटोतील घटना सन १९४१ च्या फेब्रुवारीतील आहे. वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ सुरू होऊन तीन महिने झाले होते सेवाग्राम आश्रमात कामें नित्याप्रमाणे चालू होती होतकरू सत्याग्रही-च्या नावाच्या याद्या गांधीजींकडे येत होत्या व त्या तपासून ते निर्णय देत होते. याच कालात मुंबईहून एक पारसी भगिनी आली. बाई होती पोक्त पण खूप बोलकी व बालकाप्रमाणे निरागस! गांधीजी-बद्दल तिच्या मनात खूप भक्ति-भाव होता. मुंबईत गांधीजींचा मुक्काम असला म्हणजे ती रोज सायंकाळच्या प्रार्थनेस हजर राहून गांधीजींशी लडिवाळपणे बोलत असे गांधीजीही तिचे कौतुक करीत व तिला ममतेने वागवीत. ती या वेळी सेवाग्रामला आली होती व तिसरे प्रहरी पूजासाहित्य घेऊन बापूकुटीजवळ आली आणि तिनें त्यांना हाक मारली. लिहिण्याचे काम बंद करून गांधीजी बाहेर आले व कस्तुरबा-ही आल्या. त्या दंपतीची पूजा करण्यासाठी त्या पारसी बाईने साहित्य आणलेले पहिल्या फोटोत दिसत आहे ताटामध्ये धुपाटण्यात धूप जळत आहे व नारळ आदि आवश्यक साहित्य आहे. दुसऱ्या फोटोत कस्तुरबांची पूजा करताना ती बाईही दिसत आहे. पूजा करून तिने त्यांना ओवाळले भेट दिलेल्या वस्तूत एक सुवासिक चंदनमण्याची जपमाळही होती. चंदन हे पारसी लोकांच्या धर्मकृत्यात अत्यावश्यक असते.

कॉंग्रेस मंत्रिमंडळें अधिकारापन्न झाल्यावर दारूबंदीचा कार्यक्रम अमलांत आला. मुंबईत दारूची विक्री करणारे बरेच पारसी लोक होते. त्यामुळें त्यांचा धंदा बंद झाल्यावर त्यांच्यात असंतोष पसरला होता. त्यांच्या समाजातील फार मोठ्या प्रतिष्ठित लोकांचे एक

शिष्टमंडळही गांधीजींकडे तक्रार करण्यास आले होते असे जरी होते तरी गांधीजींचे प्रथमपासून भक्त असणारे पारसी सज्जन बिथरले नाहीत गांधीजींबद्दल त्यांची भक्ति व आदर ही शेवटपर्यंत दृढ राहिली.

* *

चळवळीचे स्वरूप पुढें उग्र होत गेले तरी सेवाग्राम आश्रमातील काही खास व्यक्तींनी कायदेभंग करूं नये अशी सूचना गांधीजींनी दिली होती. बलवंतसिंग, पारनेरकर, चिमनलाल, सुकाभाऊ यांनी बाहेर राहावे असा आदेश त्यांनी दिला होता याच काळात गांधीजींनी आश्रमात सेप्टिक टँकचे संडास बनविण्यास परवानगी दिली व त्यांची बांधणी सुरू झाली. त्यांचे विविध प्रयोग चालू होते

आश्रमाची शेती व बाग यातील उत्पादन आश्रमाच्या गरजेसाठी व गरजेपुरते व्हावे अशीही गांधीजींची शिकवण असे. अन्न, वस्त्र व दूध यात आश्रम स्वावलंबी व्हावा यासाठी त्यांचे सतत प्रयत्न असत. वेगवेगळ्या कामात गुंतलेल्या कार्यकर्त्यांत सामंजस्य असावे, सर्वांनी खऱ्या अर्थाने परस्परांचे सहकारी बनावे असा उपदेश ते करीत.

• •

# ३५ कुटुंबवत्सल गांधीजी

राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु ।
शरणागतां स्नेहाळु । शरण्य जो ।।

— ज्ञानदेव

वैयक्तिक कायदेभग सुरू झाल्यावर काँग्रेस वर्किंग कमिटीचे एक सदस्य व काँग्रेसचे खजीनदार श्री जमनालालजी हेही तुरुगात गेले त्याच्या पत्नी श्री जानकीदेवी याना प्रकृति-स्वास्थ्यासाठी उपवास करावयाचा होता. गाधीजीनी त्याना सेवाग्रामच्या आश्रमात बोलावून घेतले. तेथें राहून जानकीदेवींनी पंधरा दिवसाचा उपवास केला गाधीजी रोज त्याची भेट घेऊन विचारपूस करीत. अशाच एका प्रसंगीचा फोटो समोर दिला आहे प्रसन्न चेहऱ्याने जानकीदेवी गाधीजीना सागत आहेत —"उपवास इतका चागला निभला की मुदत वाढविण्याची इच्छा होत आहे" जमनालालजीचे भाग्य की, त्याच्या कुटुबाने त्याना त्याच्या हयातीत त्याच्या ध्येयनिष्ठ जीवनात साथ दिली.

जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच ।
जे दे पतीस सुख फार कलत्र तेच ।।

जमनालालजीच्या चारही सतानात कन्या मदालसा हीच आपल्या धर्मनिष्ठेने व प्रयोगपरतेने वडिलाना अनुसरली जमनालालजीनी आपल्या मुलाना सरकारी शाळेत घातले नाही विनोबाजीचा आश्रम व बजाजवाडीत राहाणारे कार्यकर्ते याचेकडूनच त्यानी संस्कार व शिक्षण दोन्ही घेतली मदालसेने तर विनोबाजीच्या सान्निध्यात काही काळ कठिण तपश्चर्या केली पुढे तरुणपणी विवाह झाल्यावर देखील तिला गाधीजीबद्दल आणि विनोबाजींबद्दल वाटणारी ओढ कायम राहिली. तिचा पहिला मुलगा भरत हा आठ महिन्याचा

असताना ती सेवाग्रामच्या आश्रमात माहेरपणासाठी येऊन राहिली होती. भरताला गांधीजींनी कडेवर घेतले असताना फोटो काढला जावा अशी तिची इच्छा होती. ती पूर्ण झालेली दुसऱ्या चित्रात दिसत आहे. तो समय सन १९४२ मधील जुलै महिन्याचा आहे. जमनालाल-जीच्या स्वर्गवासानंतरची ही घटना आहे. पुढील प्रकरणात जमना-लालजींच्या शेवटच्या हालचाली व त्यांचा स्वर्गवास यांची हकीकत येईल.

• •

# ३६. पुत्र-वियोग

* उत्पन्नेऽपि विरागे विना प्रबोधं सुखं न स्यात् ।
स भवेत् गुरूपदेशात् तस्माद् गुरुमाश्रयेत् प्रथमम् ।।

— श्री शंकराचार्य

वैयक्तिक सत्याग्रहात जमनालालजींनी भाग घेतला व तुरुंगवास भोगला या कारागृहवासात त्यांची प्रकृति खूप ढासळली त्यामुळें ता. २१-९-४१ रोजी त्यांची सजा संपत होती तरी सरकारनें त्यांना ता. ३०-६-४१ रोजी सोडले ते शरीरानें थकले होते; त्यांच्या मनातही परिवर्तन होत होते. पूर्वीपासून त्यांचा कल धर्माकडे होता. त्यांना सतसंगाची आवड होती दक्षिणेतील प्रसिद्ध सत्पुरुष अरुणाचलचे श्री रमणमहर्षि यांची भेट घेऊन, तसेच श्री अरविंद घोष यांचे दर्शन घेऊन ते आले होते. आपणास मानसिक शांति मिळावी अशी त्यांची तळमळ होती पुढे गांधीजींनी स्व० कमला नेहरू यांच्या सद्गुरु देहरादूनच्या माता आनंदमयी यांची भेट घेण्यास त्यांना सुचविले. त्याप्रमाणे ते भेटीस गेले व त्यांना त्या भेटीपासून फार शांति मिळाल्याचे त्यांनी आपल्या रोजनिशीत लिहून ठेवले. गांधीजींना त्यांनी आपला पिता मानले त्याचप्रमाणे माता आनंदमयींना आई मानले हळू हळू त्यांचे मन राजकारणातून निवृत्त होत होते. त्यांना एके ठिकाणी वसून काही विधायक काम करण्याची इच्छा होती.

सन १९४१ च्या डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात सरकारनें वैयक्तिक कायदेभंग करून तुरुंगात गेलेल्या सर्व सत्याग्रही कैद्यांना मुक्त केले. पं. जवाहरलाल नेहरू व मौलाना आजाद यांचीही मुक्तता झाली. अर्थात् यात सरकारचा राजकीय हेतु होता. हिटलरनें रशिया-

---

* आले वैराग्य मना तरी प्रबोधाविना न सुख मिळते ।
मिळते गुरूपदेशें शरण रिघावे म्हणून सद्गुरुते ।।

वर स्वारी केली होती व रशियातून तो पूर्वेकडे येणार हे निश्चित होते. तिकडे जपानने चिडोचायनात आपले पाऊल घट्ट रोवले होते व महायुद्धात प्रवेश करण्याची तयारी तो करीत होता अशा परिस्थितीत हिंदुस्थानातील अफाट साधने व लोकशक्ति याना संघटित करणे ही युद्धाच्या दृष्टीने एक आवश्यकता होऊन बसली होती म्हणून काँग्रेसचे मत आपणास अनुकूल करून घेण्यासाठी सरकारने माफी जाहीर केली !

या घटनेनंतर थोड्याच दिवसानी जमनालालजी गाधीजींकडे आले सेवाग्रामच्या आश्रमात बापू-कुटीच्या अगणात त्याची भेट झाली, ती समोरच्या फोटोत दिसत आहे

जमनालालजी म्हणाले, "मला आता राजकारणात गोडी वाटत नाही. आता कोठेतरी शात वातावरणात बसून विधायक सेवाकार्य करण्याची इच्छा आहे आपण या बाबतीत काही सूचना करावी" गाधीजींकडून ते मार्गदर्शन इच्छित होते

गाधीजींनी सांगितले, "कामें तर पुष्कळ आहेत पण बहुतेक कामें वाटली गेली आहेत गो-सेवा-सघाचेच एक काम असे आहे की, ज्याची वाढ नीट झाली नाही जर तुम्ही ते वाढवू शकाल तर ते काम तुमच्या योग्य आहे."

जमनालालजी प्रसन्न झाले ! त्यानी लगेच समति दिली आणि कामाला लागले अखिल भारतातील गोपालन करणाऱ्या तज्ज्ञाची एक सभा जमनालालजींनी फेब्रुवारी (१९४२) च्या पहिल्या आठवड्यात वर्धा येथे भरविली. तीत गाधीजींनी महत्त्वाचे भाषण करून सर्वांना मार्गदर्शन केले जमनालालजींच्या हातून हे कार्य उत्तरोत्तर वाढत जाईल अशी गाधीजींची व सर्वांची अपेक्षा होती. पण "मनसा चिन्तित कार्यं दैवमन्यत्र चिन्तयेत् ।" या उक्तीप्रमाणे त्या अपेक्षावर अचानक घाला पडला ! ता ११ फेब्रुवारी १९४२ रोजी दुपारी जमनालालजी आपल्या वर्धा येथील निवासात एकाएकी बेशुद्ध होऊन कालवश झाले ! या घटनेने गाधीजींना सर्वांहून अधिक आघात

वसला ! त्याचा मानलेला पाचवा पुत्र त्याना सोडून गेला ! मगनलाल गांधी याच्या मृत्यूने गाधीजीना पगु बनविले होते. त्यानतर जमनालाल-जीच्या मृत्यूने तोच अनुभव दुसऱ्यादा सोसावा लागला ! खुद्द गाधीजीचे जीवन संपत आले होते. या शेवटच्या कालात त्याना घोर दु.खाचे आघात सोसावे लागले. जमनालालजीच्या मागोमाग कारागृहात महादेवभाई प्रथम गेले, नतर कस्तुरबा गेल्या !

सत तुकारामच्या भूमिकेवर ते आले –

**बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ।।१।।**
**विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचे काज ।।२।।**
**बाइल मेली मुक्त झाली । देवे माया सोडविली ।।३।।**
**पोर मेले बरे झाले । देवे मायेविरहित केले ।।४।।**
**माता मेली मज देखतां । तुका म्हणे हरली चिंता ।।५।।**

* * *

गाधीजीच्या जीवनात जमनालालजीचे अनन्य स्थान होते. त्याच्या सर्व कामात जमनालालजीचा सहयोग होता. सेवाग्रामचा आश्रम तर त्याच्याच जमिनीवर वसला होता. स्वत च्या मालकीची सुमारे पचाहत्तर एकर जमीन त्यानी आश्रम व हिंदुस्तानी तालीमी संघ याना देऊन टाकली व मालगुजारीच्या अधिकाराखाली येणारी जमीन आश्रमातर्फे विकत घेतली गेली तेव्हा जी किंमत आश्रमातर्फे ठरविण्यात आली तीच त्यानी मंजूर केली त्याच्या दातृत्वाचा डका देशभर गाजत होता त्याचा सर्व तपशील येथें देणे ग्रथाच्या मर्यादेच्या दृष्टीनें उचित होणार नाही पण एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. जमनालालजीनी गाधीजीच्या दोन्ही आश्रमाना (सत्याग्रहाश्रम व सेवाग्राम आश्रम) भरपूर मदत केली होती. त्याचप्रमाणे दोन्ही आश्रमातील स्थायी कार्यकर्त्यांशी स्वतंत्रपणे सबंध जोडले होते व त्यानाही त्याच्या गरजेप्रमाणे ते मदत करीत, त्याना मार्गदर्शन करीत, त्याची सुखदु खें जाणून घेत. गांधीजीनी त्याना आपली "कामधेनु" म्हटले होते ते सर्व दृष्टीनी सत्य होते !

जमनालालजींच्या स्वर्गवासानंतर थोड्याच दिवसांनी माता आनंदमयी एकाएकी वर्ध्यास आल्या. जमनालालजींच्या कुटुंबियांनी त्यांना आदरपूर्वक ठेवून घेतले. एकदा त्या सहपरिवार सेवाग्रामला येऊन गांधीजींना भेटून गेल्या. सुरुवातीचे दुसरे चित्र त्याच प्रसंगाचे आहे. गांधीजी माता आनंदमयींशी बोलत आहेत. माताजींची पाठ कॅमेऱ्याकडे आहे तरी त्यांच्या चेहरा ओझरता दिसत आहे.



# ३७ लुई फिशर यांची भेट

राखों जाणे नीतिन्याय । न करी न करवी अन्याय ।
कठिण प्रसंगीं उपाय । करूं जाणे ।।

– दासबोध

अमेरिकन वातमीदार लुई फिशर याचे नाव जगविख्यात आहे. सन १९२१ पासून पुढील पचवीस वर्षे त्यानी यूरोप व आशिया या खडात फिरून अमेरिकन वृत्तपत्र "न्यूयॉर्क पोस्ट" यास बातम्या पाठवण्यात घालविली. रशिया, भारत व मध्यपूर्व या देशाबाबत अधिकारवाणीने सागणाऱ्या व्यक्तीत त्याची गणना होते. दुसरे महायुद्ध सुरु झाले तेव्हा ते फ्रान्समध्यें होते काही महिने ते पॅरिस व लडन याच्या दरम्यान ये जा करीत राहिले नंतर इतर राष्ट्रातही त्यानी प्रवास केला.

सन १९४२ च्या मे महिन्यात ते हिंदुस्थानात आले. दोन महिने येथेच राहिले. महायुद्धाचे स्वरूप तेव्हा फारच उग्र झाले होते! जपानने ब्रह्मदेश जिकला होता. सारा भारत अस्वस्थ झाला होता! ब्रिटिश सरकार व लोकही अस्वस्थ झाले होते!

जूनच्या पहिल्या आठवड्यात लुई फिशर सेवाग्रामला आले. एक आठवडा त्यानी आश्रमात घालवला. रोज एक तास त्याची गाधीजींशी भेट होई. शिवाय जेवताना अगर फिरावयास जाताना बोलणे होई. आठवड्याचा सहवास पुढें त्यानी शब्दबद्ध करून पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला.

समोरच्या चित्रात गाधीजी व लुई फिशर दिसत आहेत. त्यावेळी उन्हाळा होता. अंगाची लाही होत होती. थड प्रदेशातील त्या रहिवाशाला सेवाग्रामची हवा असह्य झाली! तरी ते सर्व अडचणी सहन करून तेथें राहिले. कारण ते मनाने गाधीजीचे चाहाते होते.

आठवड्याच्या सहवासानंतर गांधीजींना ते अधिक समजू लागले त्यामुळें त्यांच्या पुष्कळच जवळ आले. उभयतामध्यें मोकळी चर्चा झाली गांधीजींचा खेड्यातील जीवनाशी समरस होण्याचा आग्रह त्यांनी प्रत्यक्ष पाहिला त्यांचे उठणे, बसणे, पोशाख, सवयी, आवडी या सर्वांचे त्यांनी मार्मिक वर्णन केले आहे तरी देखील देशातील दैन्य प्रत्यक्ष पाहिल्यावर त्यांनी लिहिले, "खेड्यातील शेतकऱ्याच्या कपड्याची दैन्यावस्था पाहिल्यास गांधीजीजवळ अंगभर कपडे आहेत असे म्हणता येईल बहुसंख्याक हिंदी लोक नेहमी – अक्षरश नेहमी – भुकेलेले असतात"

लुई फिशरनी विचारलेल्या प्रश्नावरून गांधीजींनी कबूल केले की काँग्रेस पक्षाचा खर्च श्रीमंत उद्योगपतीकडून मिळतो व खुद्द त्यांचा खर्च देखील मुंबईतील श्रीमंत गिरणीमालकाच्या देणग्यातून होतो. ते पुढे असेंही म्हणाले, "उदाहरणार्थ, हा आश्रमच घ्या ना ! आज आम्ही ज्या पातळीवर राहात आहो तीहूनही गरीबीने व कमी खर्चांत राहू शकू पण तसे आम्ही करीत नाही, कारण आमच्या श्रीमंत मित्राकडून पैशाच्या देणग्या मिळतात" मात्र या आर्थिक मदतीचा परिणाम स्वत च्या किंवा काँग्रेसच्या राजकीय व आर्थिक धोरणावर बिलकुल होत नाही, असेंही त्यांनी सांगितले

गांधीजीबद्दल फिशर लिहितात "गांधीजीच्या सान्निध्यात मला त्यांच्याबद्दल वचक वाटला नाही मला वाटले, मी एका अतिशय गोड, सौम्य, मोकळ्या, स्वस्थ, आनंदी, शहाण्या व अतिशय सुसंस्कृत मनुष्याच्या संगतीत आहे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा चमत्कारही मला जाणवला. जवळ जबरदस्त संघटनेचे सामर्थ्य अगर सत्ता नसताना गांधीजींनी आपल्या विस्कळित देशाच्या कोनाकोपऱ्यात स्वत च्या प्रभावाची किरणे फाकवली होती ! इतकेच नव्हे तर विभागलेल्या *जगाच्याही कोनाकोपऱ्यात ती पोचवली होती !* *लोकापर्यंत* पोचण्याची त्यांची साधने म्हणजे प्रत्यक्ष संपर्क, क्रिया, प्रत्यक्ष उदाहरण (जीवनातून) आणि सत्य, अहिंसा, साधनशुद्धि अशासारख्या थोड्या त्रिकालाबाधित सिद्धांतांशी निष्ठा !"

* * * *

# ३८ दिव्य आहुति !

देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांशीं तुटी ।
सर्व अर्पावे शेवटीं । प्राण तोही वेचावा ।।

– दासबोध

सन १९४२ च्या जुलै महिन्यात गाधीजीच्या हृदयात तीव्र रूपाचे मन्थन चालले होते ! त्याचे जीवन सत्याला समर्पण झाले होते सत्याच्या साक्षात्काराची त्याना अखड तळमळ होती व तो व्हावा म्हणून त्यानी अहिंसा हे परम श्रेष्ठ साधन ठरविले होते अर्थात् जीवन अखड असल्यामुळे जीवनातील सर्वच क्षेत्रातून साधनशुद्धीचा आग्रह ठेवणे भाग होते राजकारणात ते शिरले कारण आपल्या देशास स्वातत्र्य मिळवून देणे हा आपला धर्म आहे असे त्यानी मानले होते सन १९३० च्या दाडी-यात्रेत एका भाषणात त्यानी असे उद्गार काढले होते की, "या सैतानी इग्रजी राज्यात माझा देव हरवला आहे, त्याला मी शोधीत आहे माझ्या श्वासाश्वासागणिक मी या इग्रजी शासनाचा नाश इच्छितो" मानवात मधून मधून जे दैवी अवतार प्रकट होतात, त्याचे मुख्य कार्य म्हणजे धर्मसस्थापना हेच असते त्याचा स्थूल परिणाम भौतिक दृष्ट्या देशाचे स्वातत्र्य सपादन करण्यात होतो गाधीजी भारताच्या स्वातत्र्यासाठी उतावळे झाले होते दुसरे महायुद्ध सुरू होऊन तीन वर्षे झाली होती इग्रजाची सर्वत्र पीछेहाट चालू होती तरी त्याची कोडगी निष्ठुरता मुळीच कमी झाली नव्हती त्याचे गाधीजीना आश्चर्य वाटत होते ! भारताला युद्धाच्या खाईत लोटून त्याने प्राणपणाने आपल्या जोडीने आपल्या शत्रूशी लढावे अशी अपेक्षा इग्रज सरकारने बाळगली होती, पण भारताला स्वातत्र्य देण्यास ते कबूल नव्हते क्रिप्ससाहेब आले व गेले, पण परिस्थिति जैसे थे राहिली ! महायुद्धानतर कॉंग्रेसचे धोरण ठरविण्यात गाधीजीशी कॉंग्रेसच्या प्रथम पक्तीच्या पुढाऱ्याचे – मौलाना

आजाद, प नेहरू, सरदार वल्लभभाई व श्री राजगोपालाचार्य याचे – मतभेद झाले होते पण इग्रज सरकारच्या नकारामुळे ते सारे पुन्हा गाधीजीभोवती गोळा झाले व प्राप्त परिस्थितीवर तोडगा शोधून काढण्याचे सर्व अधिकार त्यानी गाधीजीना देऊन टाकले !

या प्रचड व गुतागुतीच्या जबाबदारीमुळें गाधीजी फार चिंतेत पडले ! सेवाग्रामच्या आश्रमात राहून ते सतत चिंतन करू लागले त्याची प्रकृतिही बरी नव्हती तरी आपल्या प्रकृतीकडे लक्ष देणे त्याना शक्य नव्हते कारण आत्मबलिदानाचे विचार त्याच्या मनात घोळू लागले होते ता २६ जुलै रोजी त्यानी विनोबाजी, किशोरलालभाई व इतर काही कार्यकर्ते याना बोलावून घेतले व आपले मानस त्याच्या-पुढे उघड केले आपल्या मागील सर्व उपवासाची मीमासा करून त्यानी सागितले, "मार्गे एकदा चळवळीतील अशुद्धतेमुळे देशात एक वर्षभर उपवासाची साखळी सुरु करावी अशी माझी भावना होती, पण सोबत्याना माझी योजना पटली नाही म्हणून मला ती स्थगित करणे भाग पडले पण आता मला दिसत आहे की, ती टाळता येणार नाही या समयी हिंसा आपल्या पूर्ण वेगात आहे आणि जगभर एक प्रकारचा अधार पसरला आहे या देशात देखील विषाचा प्रसार केला जात आहे सरकार आमचीच माणसे आमच्या विरुद्ध उभी करून स्वत तमाशा पाहू इच्छिते मला हे सहन कसे व्हावे ? मला तर वाटते की आता बलिदान दिल्याशिवाय ही ज्वाला शात होणार नाही "

आणखीही ते या विषयावर पुष्कळ बोलले नतर चर्चा झाली शेवटी गाधीजीनी निर्णय दिला की, "पहिले बलिदान माझेच झाले पाहिजे ' किशोरलालभाई गप्प बसले, पण विनोबाजीनी आपली समति दिली बैठक विसर्जन झाली परतु महादेवभाई बेचैन झाले त्याना गाधीजीची योजना व विनोबाजीनी तिला दिलेली समति – दोन्ही गोष्टी आवडल्या नाहीत त्यानी एक दीर्घ पत्र गाधीजीना लिहून आपला विरोध कळविला त्यावर गाधीजीनी त्याचे पत्र विनोबाजीकडे विचारार्थ पाठवून दिले त वाचून विनोबाजीनी त्यावर

मनन करून महादेवभाईंच्या युक्तिवादाचेही समर्थन केले व क्षोभ तात्पुरता शात झाला ।

ऑगस्टच्या ७ व ८ तारखास मुबई येथे अखिल भारतीय काँग्रेस समितीची बैठक होती ती सपल्यावर पहाटेच्या रात्री गाधीजी-सह सर्व पुढाऱ्याना सरकारने पकडून बदोबस्तात कैदेत ठेवले व आगाखान महालात गाधीजी सहपरिवार असताना प्रथम महादेवभाई व नतर कस्तुरबा याचे अवसान झाले वगैरे कथा आता इतिहास-जमा झाली आहे ५ ऑगस्ट १९४२ रोजी कस्तुरबा व महादेवभाई यानी सेवाग्रामचा आश्रम सोडला तो कायमचाच ! दोघे पुन्हा परत आली नाहीत गाधीजीनी आपला २१ दिवसाचा उपवास त्या दोघाच्या अवसानादरम्यान केला होता त्यात तेही मृत्यूच्या द्वारा-पर्यंत जाऊन परत आले होते सत्याचे प्रयोग दिवसेदिवस उग्र होत चालले होते गाधीजी त्यात वरचेवर आहुति देत होते । तरी सत्य आपले "भयाना भय भीषण भीषणानाम्" रूप आवरून घेत नव्हते त्याच्या शेवटच्या बलिदानानतरच ते शात झाले ।।

सन १९४४ च्या मे महिन्यात गाधीजीची मुक्तता झाली त्या-नतर प्रकृतिस्वास्थ्यासाठी ते पुणे, जुहू, पाचगणी वगैरे ठिकाणी आळीपाळीने राहिले. ऑगस्टच्या दुसऱ्या आठवड्यात ते सेवाग्रामला परत आले सोबत खूप माणसे होती पण वर्षानुवर्षांचे ते दोन निकट साथी नव्हते । आगाखान महालात कस्तुरबानी तुळशीचे एक रोप वाढवले होते ते गाधीजीनी जपून आपल्या सोबत आणले होते एका पवित्र दिवशी कस्तुरबाचे ते पावन स्मारक गाधीजीनी आपल्या हातानी आश्रमातील वृदावनात लावले । सुरवातीच्या चित्रात तो प्रसग आहे ।

• •

# ३९ ऑगस्ट-आंदोलन व नंतर

**विपत बराबर सुख नहीं, जो थोडे दिन होय ।**
**इष्ट मित्र और बन्धु सब, जान पडे सब कोय ।।**

सन १९४२च्या ऑगस्टमध्ये गाधीजी व त्याचे सहकारी पुढारी तुरुंगात गेल्यावर इतिहासप्रसिद्ध ऑगस्ट-आदोलन सुरू झाले ' त्यात देशाची त्याचप्रमाणे सेवाग्राम आश्रम व खेडें याचीही कसोटी झाली ' गाधीजी खेड्यात येऊन बसले ते खेड्यातील लोकाची सेवा करण्यासाठी व त्याची सामाजिक व आर्थिक पातळी उचावण्यासाठी ' सेवाग्राम खेड्यातील लोकाना त्यानी राजकारणाचे धडे कधीच दिले नाहीत आश्रमामुळे खेड्यातील बेकार लोकाना कामे मिळून मजूरी सुटू लागली, शिक्षण वाढले, कुटीरोद्योग सुरू झाले, आरोग्य व स्वच्छता याचे धडे मिळू लागले खेड्यात सुधारणा होत गेली. गाधीजीना गडी मोलकरणी ठेवून आश्रमातील गृहकृत्ये त्याचेमार्फत करवून घेणे पसत नव्हते तरी हरिजनाच्या उद्धारासाठी त्यानी आश्रमाच्या स्वयपाकघरात त्याचेकडून कामे करवून घेण्यास मोकळीक दिली होती कृष्णचद्रजीच्या हाताखाली पाडुरग कापसे व वरोडा खेड्याचे विश्वनाथ यानी काम करून खूप शिक्षण घेतले तुळशीराम आवुलकर व दौलतराव यानी आश्रमाच्या जमाखर्चखात्यात काम करून आपली प्रगति करून घेतली. गोपाळराव व प्रल्हाद हेही याचप्रकारे शिक्षण घेऊन तयार झाले दशरथ गवई सामान्य कार्यकर्ता होता तो पुढे चरखासघाचा कुशल शिक्षक बनला. आपल्या पत्नीलाही त्यानें विणकामाचे शिक्षण देऊन तयार केले तुकाराम जामलेकर पूर्वी नागपूरच्या मिशनरी सस्थेतर्फे सेगावमध्यें शाळा चालवीत होता. शाळेंत मुलाना ख्रिस्ती धर्माकडे ओढण्याचा प्रयत्न केला जाई गाधीजीनी त्याला खूप समजावून पाहिले, नागपूरच्या बिशपशीही त्यानी

पत्रव्यवहार केला. पण सुरुवातीस त्याच्या प्रयत्नाना यश आले नाही. शेवटी प्रयत्न चालू ठेवल्यावर यश मिळाले व खिस्ती धर्माचा प्रचार बद झाला. पुढे जामलेकरला गावातील लोकानी समजावल्यावर त्याने मिशनची नोकरी सोडून दिली व तो आश्रमात येऊन काम करू लागला गावातील मिशनची शाळा बद झाली भारतानद यानी शिवरामला सुतारकाम शिकविले याच प्रकारे हरिभाऊ, गणपतभाऊ अवारी वगैरे आणखीही कार्यकर्ते तयार झाले

गाधीजी तुरुगात गेल्यावर आश्रमात किशोरलालभाई मार्गदर्शक बनले सेवाग्रामचा आश्रम सत्याग्रह-आदोलनाचे केंद्र बनला सेवाग्राम खेडे व आसपासची खेडी यातूनही पुष्कळ जण सत्याग्रह करण्यास तयार झाले, ते सर्व आश्रमात येऊन राहिले रामपत ओझा नावाच्या एका पोलीस शिपायाने नोकरी सोडली व तो चळवळीत शिरला वर्ध्यातील टागेवाल्यानीही सरकारी अधिकाऱ्याशी असहकार पुकारला ! !

ता २३ ऑगस्ट रोजी किशोरलालभाईंना पकडण्यात आले त्यानतर आश्रमातील भगिनीची एक तुकडी कायदेभग करून तुरुगात गेली सेवाग्राम खेडचातील काही नवयुवकही याच वेळी कायदेभग करून तुरुगात गेले सेवाग्रामपासून पाचसहा मैल दूर असलेल्या सेलूकाटा खेडचातून अतिशय लायक सत्याग्रही निघाले आश्रमातील बहुतेक भगिनी तुरुगात गेल्या किशोरलालभाई तुरुगात गेल्यावर बलवतसिंग आश्रमातील आदोलनाची सूत्रे चालवू लागले चरखासघातर्फे सुकाभाऊ चौधरी त्याचे मदतीस होते चिमनलालभाईंना सात दिवस तुरुगात ठेवून पोलीसानी सोडून दिले, यद्यपि त्यानी कायदेभग केला नव्हता. बलवतसिंगही तुरुगात जाऊन आले पोलीसानी कैद्यावर जुलूमही खूप केला, पण सत्याग्रही नमले नाहीत. त्या काळातील फार मोठी घटना भणसाळीभाईंचा उपवास ही होय मागे त्याचा उल्लेख आलाच आहे देशात सत्याग्रहाचे वादळ सुरू झाले तरी भणसाळीभाई आपल्या चरख्यातच मस्त होते पुढे बलवतसिंगाच्या सूचनेवरून ते आपला चरखा घेऊन वर्ध्यास गेले तेथेच त्याचा

अनेकवार तुरुगवास झाला. पोलीस त्याना पकडीत व ते तुरुगात गेल्यावर त्यानी उपवास सुरू केला म्हणजे त्याना सोडून देत शेवटी चिमूर येथील स्त्रियावर पोलीसानी अत्याचार केल्याचे कळताच त्याची दाद मागून घेण्याकरिता ते दिल्लीस गले तेथें कौन्सिलर श्री अणे याचेकडून अन्यायाची दाद मागण्याचे त्याचे प्रयत्न अयशस्वी होताच त्यानी उपवास सुरू केला, तो त्रेसष्ठ दिवस चालला. त्या दरम्यान त्याना खूप यातायात करावी लागली पण शवटी सत्याचा जय झाला !

मुन्नालालभाई, रमणलालभाई व मोहनसिंह या सर्वांनी कारावास भोगला आश्रमाने आपल्या शक्तीप्रमाणे आदोलनात वलिदान दिले स्त्रीपुरुषापैकी कोणीही मागे राहिले नाहीत

* * * *

सन १९४४च्या मे महिन्यात गाधीजी मुक्त झाले व आपलें आरोग्य सुधारल्यावर ऑगस्टमध्ये सेवाग्रामला पोचले त्यावेळी त्याचे मनात असा विचार घोळत होता की, आश्रमातील कार्यकर्ते वाहेर गेलें तर अधिक चागले काम करतील, म्हणून त्याना वाहेर पाठवून द्यावे. या विषयाची चर्चा त्यानी आश्रमातील मडळीशी वरेच दिवस चालविली, पण तीतून फारस काही निष्पन्न झाले नाही मात्र आगाखान महालातून परत आल्यानतर आश्रमात सूत्रयज्ञाचे वातावरण वाढत चालले रोज अमुक वेळी आश्रमातील सारी माणसे एकत्र वसून सूत कातीत असत त्यावेळी वातारण गभीर वनून जाई सुरुवातीस हा सामुदायिक सूत्रयज्ञ महादेवभाईंच्या निवासात, ज्या खोलीत ते वसून काम करीत, त्या खोलीत होत असे गाधीजी आपल्या या दीर्घकालीन इमानी सोवत्याला कधीच विसरले नाहीत त्याच्या मृत्यूनतर ते त्याचे उघड पूजारी बनले कस्तुरवाच्या वावतीतही तसेच झाले त्या फेब्रुवारीच्या २२ तारखेस वारल्या होत्या म्हणून दर महिन्याच्या २२ तारखेला आश्रमात पहाटे गीतापारायण होत असे सूत्रयज्ञही होई वाना तुलसीरामायण प्रिय होते म्हणून त्याचेही पारायण केले जाई अशा प्रसगी गाधीजी सारा

कार्यक्रम' बापुकुटीमध्ये घडवून आणीत. प्रयागातही ते २२ तारीख कधी विसरत नसत.

प्रारंभीच्या चित्रात गांधीजी सूत्रयज्ञासाठी महादेवभाईंच्या निवासाकडे जाताना दिसत आहेत. उजवीकडे आश्रमाचे व्यवस्थापक चिमनलालभाई शाह हे असून डावीकडे सुशीलाबहन नायर या आहेत.



# ४० निरोधन

उदंड धिक्कारूनि बोलती । तरी चळो नेदीच शांति ।
दुर्जनासी मिळोनि जाती । धन्य ते साधु ।।

— दासबोध

गाधीजी सेवाग्रामला आल्यानंतर त्याना फार दिवस स्वस्थता मिळू शकली नाही कॉंग्रेसची कार्यकारिणी अहमदनगरच्या किल्ल्यात बदिस्त होती तरी इतर बहुतेक कैदी सुटले होते. तीन प्रातात मुस्लिम लीगची मंत्रिमडळे कारभार करीत होती. इतरत्र ब्रिटिश सरकारनें नेमलेले अधिकारी कारभार करीत होते राजकारण तुबले होते ! कॉंग्रेस व मुस्लिम लीग याच्यात पटत नसल्यामुळें इग्रज सरकारचे फावले होते देशातील विचारवताना ही परिस्थिति असह्य वाटत होती मुस्लिम लीग तर्फे व बाहेरूनही जनाव जिनावर दडपण आणले जात होते की, "स्वातत्र्याचा मार्ग मोकळा करण्यासाठी कॉंग्रेसशी तडजोड करावी." त्यानतर जनाब जिनानी ५ ऑगस्ट १९४४ रोजी जाहीर निवेदन करून गाधीजीना विनति केली की, "आपण दोघानीं भेटावे अशी सार्वत्रिक इच्छा दिसते आता आपण भेटणार आहोच, मदतीची वृत्ति असावी. मागील सर्व विसरून जावे" जनाव जिना गाधीजीना कधीच 'महात्मा' या सबोधनानें गौरवीत नसत. पण या निवेदनात त्यानी ते विरुद वापरले !

या निवेदनामुळें जनतेच्या आशा वाढल्या व उत्कठा शिगेस पोचली ! गाधीजी जनाव जिनाना मुबईत भेटण्यासाठी ८ सप्टेंबर रोजी सेवाग्रामहून रवाना होणार होते पण ही बातमी प्रसिद्ध होताच हिंदुमहासभेच्या व त्याच्या विचाराच्या अनेक लोकाना सताप आला. मुस्लिम लीगने लाहोरच्या अधिवेशनात मुसलमानाकरिता पाकिस्तानची मागणी केली होती हिंदुमहासभावाल्याना वाटले की, स्वातत्र्यासाठी मुस्लिम लीगला ही किंमत देऊन गाधीजी देशाची

फाळणी करण्यास उद्युक्त होतील. त्यामुळें त्याचेपैकी मतान्ध युवकाची एक टोळी गाधीजीची अडवणूक करण्याकरिता सेवाग्रामला आली. त्याचे मुख्य थत्ते नावाचे एक गृहस्थ होते. त्यानी सेवाग्रामच्या आश्रमात धरणे धरले पहिल्या दिवशी थत्त्यानी ताकीद दिली की, "धरणे हे पहिले पाऊल आहे. जरूर वाटली तर जिनाना भेटावयास गाधीजी निघाल्याबरोबर त्याना जबरदस्तीने अडविले जाईल." आपली धमकी अमलात आणण्याकरिता त्यानी बापूकुटीच्या तीनही फाटकासमोर निरोधक उभे केले. गाधीजी शात होते. त्यानी निरोधकाना समजावण्याचा प्रयत्न केला, पण ते ऐकेनात तेव्हा गाधीजीनी ठरवले की, आपण त्याच्यामधून वाट काढून पायी चालत वर्धा स्टेशनकडे जाऊ जर निरोधकाचे हृदय-परिवर्तन झाले व त्यानी आपणास गाडीत बसू दिले तरच गाडीत बसू

दरम्यान वर्धा जिल्ह्याचे पोलीस सुपरिटेंडट शिपाई घेऊन आले त्यानीही निरोधकाना समजावण्याचा प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरताच त्यानी त्याना पूर्वसूचना देऊन कैद केले व गाधीजीचा मार्ग मोकळा केला.

पोलीसानी थत्त्याची झडती घेतली तेव्हा त्याचेजवळ एक खजीर सापडला. पोलीसानी त्याबद्दल विचारताच थत्ते म्हणाले, "आम्ही निरोधन करणार असल्याचे ऐकून खाकसारानीही प्रतिनिरोधन करण्याचे जाहीर केले होते. तसे झाल्यास स्वत च्या बचावासाठी म्हणून हा खजीर जवळ बाळगला होता" थत्त्याना पकडणाऱ्या पोलीस अधिकाऱ्याने म्हटले, "शहीद झाल्याचे समाधान तुम्हाला मिळालेच असेल!" थत्ते म्हणाले, "छे! गाधीजीची हत्या झाल्याशिवाय समाधान वाटणार नाही." अधिकारी विनोदानें म्हणाला, "या भाडणाचा निकाल पुढाऱ्यानाच का सोपवून देत नाहीं? सावरकर वाटल्यास स्वत येऊन ते काम करतील" त्यावर थत्त्याने उत्तर — "एवढा मोठा बहुमान गाधीजीना मिळणार नाही. जमादार हें काम तडीस नेईल."

यत्याबरोबर नथूराम विनायक गोडसे होता, त्याला उद्देशून त्यानी 'जमादार' म्हटले होते. पुढे साडेतीन वर्षांनी यत्याचे भाकित खरे ठरले ! !

प्रारभीच्या चित्रात गाधीजी निरोधकाशी बोलत आहेत. बाजूस प्यारेलाल उभे आहेत. जवळच त्याचा छोटा नातू आपल्या सोबत्यासह उभा आहे. गाधीजी निर्भयतेची मूर्ति होते. त्याना कोणाबद्दलही द्वेष वाटत नव्हता. गीतेतील आदर्श –

शत्रु मित्र उदासीन मध्यस्थ परका सखा।
असो साधु असो पापी सम पाहे विशेष तो ।।

गाधीजीनी हृदयस्थ केला होता त्यामुळे कसोटीच्या वेळी ते कधीच कमी पडत नसत कार्य जेवढे महान् तेवढी मोठी विघ्नेही त्याला येणारच गाधीजीचे कार्यक्षेत्र व ध्येय ही दोन्ही एवढी विशाल होती की, त्याना झालेला विरोध व त्याचेवर आलेली सकटे हीही त्याच प्रमाणात प्रचड असणे अपरिहार्य होते ! त्याबद्दल आश्चर्य वा विषाद मानण्यात अर्थ नाही उलट विरोध व सकटे यानी त्याचा गौरव वाढविला !

सेवाग्राम आश्रमाच्या इतिहासात ही एक अपूर्व घटना घडली !



# ४१ स्मारक

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी।
मना, सज्जना, हेचि क्रिया धरावी।
मना, चंदनाचे परी त्वां झिजावें।
परी अंतरीं सज्जनां नीववावें ॥
– समर्थ रामदास (मनोबोध).

ता. २२।२।४४ रोजी महाशिवरात्रीच्या पवित्र दिनीं राष्ट्रमाता कस्तुरबा यानी आगाखान महालात कैदेत असताना देह ठेवला! ती खबर बाहेर येताच देशभर दु खाची लाट पसरली! देशात हरताळ पाळण्यात आला कौन्सिल ऑफ् स्टेट आणि पंजाब, बंगाल, ओरिसा व वायव्य सरहद्दीवरील प्रांत यांच्या कायदेमंडळानी दुखवटयाचे ठराव पसार केले हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यानी गांधीजीना सांत्वनपर पत्र पाठवले

राष्ट्रमातेचे एक उचित स्मारक करावे असे हिंदी जनतेच्या मनाने घेतले महायुद्ध व सरकारची दडपशाही यामुळे देशात अशी परिस्थिति निर्माण झाली होती की, गांधीजी व इतर कॉंग्रेस पुढारी याना लोकानी विसरुन जावे! पण जनता पुढाऱ्याना विसरली नाही. त्याच्याबद्दलची आपली निष्ठा व प्रेम व्यक्त करण्यास तिला काहीतरी निमित्त हवे होते ते राष्ट्रमातेच्या मृत्यूमुळें मिळालें व राष्ट्रातील प्रमुख मंडळींनी जमून त्याच्या स्मारकासाठी देणग्या देण्यास जनतेला आवाहन केले! २ ऑक्टोबर १९४४ रोजी गांधीजीना पंचाहत्तर वर्षे पुरी होणार होती तेव्हा पंचाहत्तर लक्ष रुपयाचा निधि स्व. कस्तुरबाच्या नावे गोळा करावा व गांधीजी तोवर सुटले तर त्याच्या ७५ व्या जन्मदिनी त्याना अर्पण करावा, असे जनतेनें ठरविले. त्याप्रमाणे काम सुरू झाले व देणग्यांच्या वर्षाव झाला!

गाधीजी १९४४ च्या मे महिन्यात सुटले, त्यामुळें तर देणग्याना उधाण आले ! त्याच्या जन्मदिवसापर्यंत निधि ऐंशी लाखावर गेला ! श्रीमंत-गरीव, सुशिक्षित-अशिक्षित, सरकारी अधिकारी-नोकर, मजूर, कैदी सर्वांनी आपापली वर्गणी दिली.

आपल्या पचाहत्तराव्या जन्मदिवशी गाधीजी सेवाग्राममध्येंच होते मडळी जमली आश्रमात एक छोटासा समारभ करण्यात आला. श्री सरोजिनीदेवी नायडू याचे हस्ते निधीचा चेक गाधीजीना अर्पण करण्यात आला

समोरील चित्रात गाधीजीच्या हातात चेक दिसत आहे समोर सरोजिनीदेवी वसल्या आहेत गाधीजीच्या डावीकडे अगदी कडेला निधीचे मत्री श्री अमृतलाल ठक्कर हे उभे राहून भाषण करीत आहेत.

या निधीतून कस्तूरबा गाधी राष्ट्रीय स्मारक ट्रस्टची स्थापना झाली व त्याचा विनोयोगही गाधीजीनी एका अभिनव पद्धतीनें करावयाचे ठरविले कस्तुरवा या अशिक्षित, साध्या, खेडवळ बाई होत्या आपली सेवाशक्ति, त्यागवृत्ति, प्रेमळपणा व पवित्र आचरण या योगें त्या श्रेष्ठ योग्यतेस पोचल्या त्याचे स्मारक त्याना शोभेसे व्हावे अशी गाधीजीची इच्छा होती आजपर्यंत सर्व निधीचे नियामक पुरुप होते गाधीजी म्हणाले, "या निधीच्या नियामक स्त्रियाच असल्या पाहिजेत. हा निधि खेड्यातील स्त्रियाच्या विकासासाठी उपयोगात आणला जाईल व हे काम स्त्रियाच करतील" त्याप्रमाणे देशातील प्रत्येक प्रातात स्मारक-ट्रस्टतर्फे एक एक स्त्रीप्रतिनिधि नेमण्यात आली व दोन हजार वस्तीपेक्षा कमी वस्तीच्या खेड्यातील स्त्रियाच्या विकासासाठी योजना आखण्यात आल्या. हे काम सुमारे दहा वर्षें नीट चालले निधि आणखीही जमला, परतु दहा वर्षानतर वराचसा निधि सपल्यामुळे व ट्रस्टमधील जुनी मडळी मत अगर निवृत्त झाल्यामुळें ट्रस्टच्या धोरणाची दिशा बदलून गेली.

पण निधीनें आपले काम केले होते. कस्तुरबानी आपल्या हयातीत स्वत चा देह चदनाप्रमाणे झिजवला होता. आपल्या पतीच्या

प्रत्येक प्रयोगात व कार्यात त्यांनी सोबत केली होती त्यामुळें जनतेने त्याना 'राष्ट्रमाता' ही पदवी देऊन त्याचे स्मारक केले देहत्यागानतर देखील त्या स्मारकरूपानें जिवंत राहिल्या.

आगाखान महालातील त्याची तुळस गाधीजीनी त्याच दिवशी (त्याना निधि अर्पण करण्यात आला त्या दिवशी) वृदावनात लावली!



# ४२ विवाहोत्तर संयम

**संत कष्ट सहे आपही, सुखी राखे जु समीप ।**
**आप जरै तहँ और को, करै उजेरो दीप ।।**

सेवाग्राम आश्रमात अनेक वधूवराची लग्ने झाली, पण ती बाहेरील व्यक्तीची होती चिमनलालभाईची कन्या शारदा व पारनेरकराची शरद या आश्रमातील कार्यकर्त्यांच्या मुली दूरच्या वराशी लग्ने करून अन्यत्र ससार करू लागल्या पण कनु व आभा याची गोष्ट वेगळी होती कनु हा नारायणदासभाई गाधी याचा मुलगा गाधीजीचे अेक दूरचे चुलत बधु राजकोट येथें राहात असत त्याच्या चारही पुत्रानी गाधीजीच्या कार्यास स्वत ला वाहून घेतले होते त्याच्या पैकी तिसरे पुत्र नारायणदासभाई साबरमती येथील सत्याग्रहाश्रमाच्या शेवटच्या कालात त्यानी मत्री या नात्यानें आश्रमाचा कारभार साभाळला तो आश्रम विसर्जन पावल्यावर ते राजकोटला राहून राष्ट्रीय शाळा चालवू लागले त्याचा दुसरा मुलगा कनु त्याने सरकारी शाळेंत शिक्षण कधीच घेतले नाही प्रथम साबरमतीच्या आश्रमात राहून त्यानें शिक्षण घेतले त्याला वादन, फोटोग्राफी, व्यायाम व खेळ इत्यादीची फार आवड होती सेगावला आश्रम स्थापला गेल्यावर तो त्या आश्रमात येऊन राहिला गाधीजीना फोटोबद्दल आवड नव्हती पण कनूच्या सेवेने व निष्ठेनें प्रसन्न होऊन त्यानी त्याला फोटोग्राफी शिकण्यास व आश्रमात फोटो घेण्यास परवानगी दिली होती गाधीजीच्या बऱ्याच फोटोचे जनकत्व कनूकडे जाते

सन १९४० त कलकत्याहून अमृतलाल चट्टोपाध्याय आपल्या चार मुलासमवेत सेवाग्रामला येऊन राहिले या चौघापैकी आभा नावाची एक मुलगी होती ती आली तेव्हा लहान होती, पण तेथेंच

राहिली व शिकली-सवरली पुढे कनु व आभा यांचे लग्न ठरले आणि सन १९४५ च्या फेब्रुवारीच्या २१ तारखेस विवाहविधि झाला. समोरील फोटोंत गांधीजी या विधीसाठी पाटावर बसलेले दिसत आहेत गांधीजींना ब्रह्मचर्य फार पसंत होतें आपला देश स्वतंत्र होई-पर्यंत तरुण मुलामुलींनी लग्नाचा विचार न करतां सेवेस जीवन समर्पण करावें असें त्यांना वाटे पण त्यांच्या स्वतःच्या गांधी कुटुंबातून देखील अशी आदर्श मुलें निघालेली त्यांना पहावयास मिळाली नाहीत. तरी देखील मनांत असमाधान न ठेवता ते विवाहोत्सुक लायक जोडप्यांना आशीर्वाद देत बहुधा त्यांनी लावलेल्या प्रत्येक लग्नांत ते नवविवाहित जोडप्याला संयमाचा उपदेश करीत. संतानाची इच्छा झाली तरच समागम करावा, नाहीतर ब्रह्मचर्य पाळावें, गृहस्थाश्रमी दंपती जर याप्रमाणे वागेल तर ते त्यांचें ब्रह्मचर्यच समजलें जाईल, असें त्यांचें निक्षून सांगणे असे

लग्नानंतर त्या जोडप्याला त्यांनी आश्रमांत राहू न देता सडके-च्या पलीकडे तालीमी संघाच्या जागेत त्यांना घर करून राहाण्यास सांगितलें. मुन्नालालभाई व कंचनबेन पुष्कळ काळ आश्रमांत व्रती होऊन राहात होती त्यांनाही आश्रमाच्या हद्दीबाहेर घर करून राहाण्यास गांधीजींनी सांगितलें

वैवाहिक जीवन देखील संयमपूर्वक व्यतीत केलें जावें म्हणजे तो खऱ्या अर्थानें गृहस्थाश्रम होईल असें त्यांचें मत होतें चारही आश्रम संयमावरच आधारलेले आहेत, त्यामुळें विवाह केल्यावर अनिर्बंध वागण्यास सूट मिळते, असा अर्थ घेतां कामा नये अशी त्यांची शिकवणूक होती

दुसऱ्या चित्रांत गांधीजी कनु व आभा यांच्या खांद्यावर हात ठेवून फिरावयास निघाले आहेत असें दृश्य आहे. सर्वांच्या मर्यादा गांधीजी समजत असत. आपली मतें व आपले आदर्श यांची जबरदस्ती कोणावरही करीत नसत व धर्माला अविरुद्ध अशा वासना पुऱ्या केल्यावरही त्यांचेवर पूर्वींप्रमाणेच प्रेम ठेवीत नोवतालच्या व्यक्तींचा विकास घडवून आणण्यांत त्यांनी अपार सहानुभूति व दूरदृष्टि दाखवली त्यामुळें ते असंख्य लोकाकडून कामें करून घेऊं शकले।

# ४३ आजार

देहेन्द्रियमनःप्राणैः सुखं दुःखं यदाप्यते ।
इममाध्यात्मिकं तापं विजानीयाद्धि देहिनाम् ।। *

गांधीजींना पारमार्थिक जागृति आली तेव्हापासून म्हणजे अगदी तरुण वयात त्यांनी आपल्या शरीराला सत्याच्या साक्षात्कारासाठी साधन बनविले होते. त्यामुळे ब्रह्मचर्य व अस्वाद ही व्रतें त्यांनी नेमाने पाळली. आजारी पडणे हा गुन्हा होय असे ते मानीत त्यांचे आहारविहार नेमस्त असत. तरी त्यांची प्रकृति पूर्णपणे निकोप अशी राहिली नाही. त्यांना मधून मधून आजार होत दूध पिणे सोडल्यावर त्यांना आमांश झाला होता व बकरीचे दूध पिऊ लागल्यावरच त्यांचे जाऊ पहाणारे प्राण परत आले, ही घटना त्यांच्या आत्मकथेत दिली आहे. सन १९२२ मधील कारावासातून ते सुटले त्याला कारण त्यांच्या अपेन्डिक्सवर शस्त्रक्रिया करण्यात आली, हेही सर्वविश्रुत आहे. सन १९४२ च्या कैदेतून सुटण्यासही त्यांना लागलेला दोषी हिंवताप कारणीभूत झाला. त्याच वेळी त्यांच्या उदरात हुकवर्मही झाले होते. या ऐतिहासिक आजारांची यादी सोडली तरी आश्रमजीवनातही त्यांना मधून मधून काहीतरी होतच असे. पुढे तर त्यांना रक्तदाबाचा आजार लागू झाला होता, जो शेवटपर्यंत टिकला.

सेगावला येऊन राहिल्यावर अनेकांना विषमज्वर व हिंवताप यांची बाधा झाली, तशीच गांधीजींनाही झाली. त्यांना सारखा ताप येऊ लागला प्रकृति फारच बिघडली तेव्हा जमनालालजींच्या आग्रहास्तव त्यांना वर्धा येथील सरकारी रुग्णालयात जाऊन काही दिवस राहावे लागले.

*देह इन्द्रिय आणि प्राण । यांचेनि योगें आपण ।
सुखदु खें शिणे जाण । या नाव आध्यात्मिक (ताप) ।।

— दासबोध ३ ६

आजारामुळे त्याना हवेच्या ठिकाणीही मधून मधून जाऊन राहावे लागत असे. तथापि त्या दिवसातही त्याची जनतासंपर्काची व मार्गदर्शनाची कामें चालू असत

आगाखान महालातून सुटताना ते आजारीच होते. तो आजार त्याना काही महिने भोवला. बरे होऊन सेवाग्रामला परत आल्यावर ते पुन्हा एकदा आजारी पडले. एकदा पोटातील वेदना असह्य झाल्यामुळें जमिनीवर गडबडा लोळून विव्हळू लागले! त्यावेळी अन्तेवासीना कस्तुरबाची आठवण झाली!

सन १९४५ मध्यें ते पुन्हा आजारी झाले होते. पोट जड वाटल्यानें त्यानी एरंडेल घेतलें. जुलाब झाले पण अशक्तपणा वाढल्यामुळें स्नानगृहातच ते बेशुद्ध पडले! काही वेळाने शुद्धीवर आले; पण झाल्या घटनेची वाच्यता न करण्यास त्यानी जवळच्याना ताकीद दिली.

सुरुवातीचा फोटो या आजारानंतरचा आहे. आजारातून उठलेले गाधीजी दूध पीत आहेत. जवळ त्याच्या चुलतभावाची नात मनु गाधी बसली आहे.

सन १९४६ च्या हिंवाळ्यात गाधीजीना जबरदस्त खोकला झाला. त्याना फार त्रास होऊं लागला म्हणून डॉक्टराच्या सागण्यावरून त्यानी बापूकुटी सोडून आखिरीनिवासात वास्तव्य केले कारण त्याचे जोते उंच असल्यामुळे ऊन व कोरडी जमीन याचा फायदा मिळू शकत होता. आखिरीनिवासाच्या पूर्वेकडील पडवीत सकाळी ते सूर्यस्नान करीत असत; कारण पडवीच्या समोर विशाल भूप्रदेश मोकळाच होता व उगवता सूर्य बराच वेळ डोळ्यासमोर दिसत असे.

या आजारातून बरे झाल्यावर गाधीजी २५ ऑगस्ट १९४६ रोजी जे बाहेर पडले ते पुन्हा आश्रमात आले नाहीत म्हणूनच त्या निवासाला आखिरीनिवास हे नाव पडले.

• •

# ४४ खेडें आणि आश्रम

संकेतें लोक वेधावा । येकूनयेक बोधावा ।
प्रपंचही सावरावा । यथानुशक्त्या ।। ७ ।।
प्रपंचसमयो ओळखावा । धीर वहुत असावा ।
संबंध पडो नेदावा । अतिपरिचयाचा ।। ८ ।।
उपाधीस विस्तारावें । उपाधींत न सांपडावें ।

— दासबोध ११-५

सेगाव हे देशातील सात लाख खेड्यापैकी एक होते हिंदी प्रजा खेड्यात वसली आहे व तिचा विकास झाल्याविना देशाचा उद्धार होणार नाही, अशी दृढ भावना मनात बाळगून गाधीजी सेगावला येऊन वसले होते सेगावची सेवा करीत असतानाच देशातील इतर खेड्याच्या विकासाची चावी हाती येईल या श्रद्धेनें त्यानी अनेक प्रयोग केले गाधीजीच्या हयातीत आश्रम व सेगाव खेडें यात अविभाज्य सबध जडला होता आश्रमाची सर्व शक्ति, बुद्धि, कौशल्य व कला याचा फायदा सेगावला दिला जात होता आश्रमात सेगावचे मजूर काम करीत हे मागें सागितलेच आहे एकदा मुन्नालालभाईनी गाधीजीना सुचवले की, आश्रमातील नोकर कामाची मजूरी घेऊन जातात, त्याऐवजी त्यानी आश्रमाच्या भोजनालयात जेवावे व त्याना थोडे पैसे वरकड खर्चासाठी द्यावे त्याच्या जेवणाचा खर्च जेवढा अधिक होईल तेवढा आश्रमाने सोसावा यामुळे परस्परात वन्धुभाव वाढेल व आश्रमवासी त्या ग्रामवासियाच्या जीवनात प्रवेश करू शकतील.

गाधीजीना ही योजना पसत पडली व त्यानी ती मजूर केली. काही दिवस हा प्रयोग चालला. मुन्नालालभाई या प्रयोगामार्गे खूप झटले नोकरावर थोडा परिणामही झाला. पण हळू हळू प्रयोग वद पडला.

सेगावच्या लोकांना लढाईच्या काळात धान्यही पुरतें मिळत नव्हते. त्यांनी बलवंतसिंहाजवळ जाऊन आश्रमाकडून मदत मिळावी अशी मागणी केली; पण अशी मदत देण्याची आश्रमाची ऐपत नव्हती. ही सन १९४६ मधील घटना आहे गांधीजी प्रवासात होते बलवंतसिंहांनी त्यांना पत्रानें ही गोष्ट कळविताच त्यांनी बलवंतसिंहाच्या योजनेस संमति देऊन जमनालालजींच्या दुकानवाल्यास पत्र पाठवले की, सेगावच्या लोकांच्या अडचणीत त्यांना धान्याची मदत करावी. गांधीजी कोठेंही असले तरी सेगावबाबतच्या आपल्या जबाबदारीचे भान कधी विसरत नसत.

गांधीजी आश्रमात असत तेव्हा खेड्यातील तंटे भांडणेंही मिटविण्याचा प्रयत्न करीत. एकदा खेड्यात भांडण झाले. एका सवर्ण मनुष्यानें एका हरिजनाचा डोळा फोडला प्रकरण पोलिसात जाणार होते. गांधीजींनी मध्यें पडून सवर्ण मनुष्याला समजावले आणि सल्ला दिली की, "ज्या हरिजनाचा डोळा फोडला त्याची सार्वजनिक रीत्या माफी मागावी व नुकसानभरपाईदाखल त्याला शंभर रुपये द्यावे." तो सवर्ण गृहस्थ सेगावचा मालगुजार होता. तो रुपये देण्यास तयार झाला पण माफी मागण्यास कबूल होईना गांधीजींनी सांगितले की, "माझ्या दृष्टीनें रुपयांना महत्त्व नाही. तुम्हाला देता येत नसतील तर मी देईन. पण तुम्ही जो गुन्हा केला आहे त्यासाठी क्षमा मागितलीच पाहिजे. शिवाय गरीब हरिजनाच्या बाबतीत तुमचेकडून अन्याय झाला आहे. तेव्हा हे दुहेरी पाप क्षमा मागितल्यावाचून धुतले जाणार नाही" तो गृहस्थ सरळ होता पण दुसऱ्यांनी त्याला पढवून माफी मागू दिले नाही शेवटी पोलीसात प्रकरण गेले व तो गृहस्थ व त्याचा मुलगा या दोघांना चार व आठ महिन्यांची शिक्षा झाली. शिवाय पुष्कळ रुपये खर्च करावे लागले ते वेगळे! गांधीजींचे ऐकले नाही या गोष्टीचा त्याला पश्चात्ताप झाला!

* -

गांधीजींच्या शेवटल्या दिवसात सेवाग्राम आश्रमात स्थायी रूपाने राहाणारी वडील मंडळी म्हणजे चिमनलाल, मुन्नालाल, बलवंतसिंह,

पारनेरकर व कृष्णचद्र ही होत. कृष्णचद्र हे उत्तरप्रदेशातील सुशिक्षित गृहस्थ – एम्. एस. सी. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर सेवाग्रामच्या आश्रमात येऊन राहिले होते. त्यानी आश्रमात कठिण तपश्चर्या केली व गाधीजींच्या कसोटीला ते उतरले. आपल्या शरीरास त्यानी पुष्कळ कष्ट दिले व सोबत्याची खूप सेवा केली.

आपल्या पश्चात् एकादशव्रताचे पालन करीत सेवाग्राम आश्रमातच मरेपर्यंत राहावयास कोण तयार आहेत, अशी पृच्छा गाधीजीनी एकदा केली होती. त्यानी एक प्रतिज्ञापत्र तयार करून ते कबूल असणाऱ्याना त्यावर सही करण्यास आवाहन केले सतरा जणानी सह्या केल्या पण आज मितीस (१९६८) त्यापैकी एकटे चिमनलालभाईच आश्रमात राहिले आहेत. इतर मडळी देशातील विविध क्षेत्रात सेवाकार्य करण्यात गुतली आहे

आश्रमात कायम न राहिलेल्या परतु सतत सबध ठेवून सेवा करणाऱ्या व त्याचे आदर्श मानणाऱ्या सेवकात श्री तात्याजी वझलवार याची गणना करता येईल. नागपूरमधील एका महाविद्यालयाचे ते प्राचार्य होते. सन १९३९-४०च्या सुमारास सेवाग्राम आश्रमाशी त्याचा सबध जुळला तो त्याच्या मृत्यूपर्यंत कायम टिकला पुढे त्यानी नोकरी सोडली व स्वतःस सार्वजनिक सेवेस वाहून घेतले मध्यप्रान्ताच्या हरिजन सेवक संघाचे ते अध्यक्ष झाले. वारंवार ते आश्रमात येऊन राहात व आश्रमाची कामे करीत असत.

आश्रमाची व्रते अक्षरश अमलात आणणाऱ्या प्रयोगवीरात वृद्ध श्रीपत बावाची गणना आहे. मूळचे ते एका खेड्यातील रहिवासी होते तरी विद्वान् होते. त्याचे वैराग्य प्रखर होते. त्याचे मन सदैव परमार्थात रमत असे. या अतिशय कष्टाळू साधकानें सन १९४२ मध्यें "जितके कमवावे तितकेच खावे," हे व्रत घेतले. त्या व्रतामुळें त्याचे पोट बिघडले. वृद्धवयात या व्रतपालनापासून त्याना ताप होऊ लागला. कारण शरीरश्रम करूनच ते कमाई करीत. वृद्धपणी सूत कातण्याशिवाय उत्पादक श्रम होऊच शक्त नव्हते. कताईत रोज दोन पैसे मिळाले तर तेवढ्याचेच फुटाणे घेऊन ते खात असत. कित्येक वर्षे हा क्रम

चालल्यामुळे त्याची प्रकृति ढासळली. प्रथम ते नालवाडीच्या आश्रमात होते. सरकारने स्वातंत्र्य-आंदोलनाच्या कालात तो आश्रम जप्त केल्यावर ते चरखा संघाच्या आवारात जाऊन राहिले. पण त्याची प्रकृति फारच क्षीण झाल्यावर आश्रमीय मंडळींनी आग्रह करून त्यांना सेवाग्राम आश्रमात आणून ठेवलें व नेहमीचा आहार सुरू करविला त्यामुळें त्याची प्रकृति थोडीफार सुधारली. नंतर त्यांनी कातणे, अध्यापन व गांधीजींच्या झोपडीची सफाई आणि व्यवस्था या कामात शेष आयुष्य घालविले.

* *

गांधीजी उत्तरेकडे कार्यान्वित असताना आश्रमात विधायक कामें चालूच होती. एक मोठी नवी विहीर बांधण्यात आली होती शेतीतहि बऱ्याच सुधारणा करण्यात आल्या होत्या सडकेवर फिरताना गांधीजींना धुळीचा त्रास होतो म्हणून शेतातून रस्ते बांधण्यात आले होते. सन १९४७च्या फेब्रुवारीच्या ११ तारखेस जमनालालजींचा श्राद्ध-दिन येत होता. त्यास गांधीजी हजर राहातील ही आश्रमवासियांची अपेक्षा होती. त्यांनी आश्रम सोडल्यास सुमारे दीड वर्ष होत आले होते तरी आश्रमासंबंधीच्या गुतागुतीच्या प्रश्नाबाबत पत्रद्वारा त्यांचे मार्गदर्शन घेतले जाई

पण ज्या शुभ दिवसाची मार्गप्रतीक्षा आश्रमवासी उत्सुकतेनें करीत होते तो दिवस उजाडला नाही !

मध्यंतरीच्या चित्रात गांधीजी आखिरीनिवास समोरून चालताना दिसत आहेत. हा प्रसंग सन १९४६ मधला म्हणजे त्यांनीं आश्रम कायमचा सोडला तत्पूर्वीचा आहे. त्यांच्या उजवीकडे राजकुमारी अमृतकौर आहेत व डावीकडे चष्मा लावलेले गृहस्थ उदितगोपाल हे आहेत. ते युनायटेड प्रेसचे बातमीदार होते व मुंबईत राहात होते. गांधीजी त्यांचेशी बोलत आहेत.

• •

# ४५ धर्मानन्द कोसम्बी

वन्हीची ज्वाळा जैसी । वायां जाय आकाशीं ।
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजी ।।

— ज्ञानेश्वरी

"विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म" अशी गाधीजीची दृष्टि व वृत्ति होती सेवाग्रामचा आश्रम स्वय एक कुटुब तर होताच पण गाधीजी वाहेरच्या आपल्या विश्व-कुटुबातूनही अनेक व्यक्तीना सेवाग्रामच्या आश्रमात बोलावून घेत, त्याचेवर स्नेहाचा वर्षाव करीत व त्याची सेवा करून आश्रमातील मडळीनाही विश्व-कुटुबकरवाचे पाठ देत. गाधीजी बाहेर प्रवासात असले तरी आश्रमात अनेक गरजूना पाठवीत व आश्रमीयाकडून त्याची आपुलकीनें सेवा करून घेत

१९४७ मध्यें गाधीजी देशातील जातीय वैमनस्याची आग विझविण्याच्या प्रयत्नात असताना त्याच्या सागण्यावरून सेवाग्रामच्या आश्रमात एक विशेष पथिक आले ! त्याचे नाव आचार्य धर्मानन्द कोसम्बी ! त्याचा जन्म गोव्यात झाला होता. गरीब परिस्थितीतही स्वप्रयत्नानें अध्ययन करून ते विद्वान् झाले त्यानी बौद्ध-वाङ्मय वाचले तेव्हा त्याना भगवान् बुद्धाच्या विचाराचे आकर्षण वाटले त्यामुळें त्यानी पाली भाषेचा अभ्यास केला व नतर ते बौद्ध झाले. सस्कृत व पाली भाषाचे विद्वान् म्हणून त्याची दिगत कीर्ति झाली ते युरोपियन देशातही फिरून आले रशियन विद्वानाच्या आमत्रणावरून ते रशियात जाऊन काही काळ राहिले व तेथील विद्वानाना सस्कृत व पाली भाषातील ग्रथाचे भाषातर करण्यात त्यानी मदत केली. तेथे असताना त्याचेवर साम्यवादी विचाराचा पगडा बसला

सन १९४७च्या जानेवारीमध्यें ते गाधीजीच्या आमत्रणावरून सेवाग्रामच्या आश्रमात आले तेव्हा त्याची सत्तरी उलटली होती.

त्याची प्रकृति फार बिघडली होती, खाल्लेले पचत नव्हते, सर्वांगास खाज सुटत असे. त्यामुळे केवळ पाण्यावर राहून देहोत्सर्ग करावा असे त्यांच्या मनाने घेतले व या प्रयोगाबाबत त्यांनी गांधीजींचा अभिप्राय विचारला. गांधीजींनी आपली संमति दिली तरी विनोबांना विचारून काय करावयाचे ते करावे असे पत्रद्वारा कळविले.

विनोबांच्या सल्ल्याप्रमाणे कोसम्बींनी काही दिवस अल्पाहार चालू ठेवला. पुढें त्यांची संमति घेऊन त्यांनी ता ४ ५ ४७ पासून तो बंद केला. शरीर हळू हळू क्षीण होऊं लागले तरी त्यांची मानसिक प्रसन्नता व बुद्धीची तीव्रता दोन्ही कायम राहिल्या. त्यांची सेवा करणाऱ्या कार्यकर्त्यांशी ते मोकळें बोलत, आपले अनुभव सांगत, भगवान् बुद्धाचे विचार समजावीत, आजारामुळें आपली तितिक्षा वाढत आहे असे सांगून आपला संतोष व्यक्त करीत. मुंबईत त्यांचे चिरंजीव व कन्या दोघेही राहात होती दोघांनी वडिलांच्या भेटीस येण्याविषयी खूप आग्रहपूर्वक विनंति केली पण कोसम्बींनी परवानगी दिली नाही. मरण्यापूर्वी त्यांनी आपले सारे सामान आश्रमास सोंपून दिले फक्त एक घड्याळ आपल्या मुलासाठी वेगळें काढले, या दृष्टीनें की मुलाला आपले काही स्मृतिचिन्ह स्वत जवळ बाळगावे अशी इच्छा झाल्यास ती अपूर्ण राहू नये

मृत्यूपूर्वी त्यांनी "आनापान" भावनेचा अभ्यास चालवला, कारण शेवटी शेवटी त्यांना क्षीणतेमुळें कष्ट फार होऊ लागले होते. मृत्यु समोर साक्षात् उभा असताही ते विचलित झाले नाहीत. ज्या मित्राची प्रतीक्षा ते बरेच दिवस करीत होते त्याच्या बाहुपाशात त्यांनी आपला क्षीण देह ता ४ जून १९४७ रोजी दुपारी अडीच वाजता शांतपणे सोडून दिला! मरणापूर्वी त्यांनी दक्षिणेकडील दरवाजा उघडण्यास सांगितले व लगेच त्यांचा प्राण गेला

मुखपातीच्या फोटोंत त्यांचा अस्थिपंजर देह दिसत आहे. जवळ श्री विनोबाजी व आचार्य कालेलकर उभे आहेत. सायंकाळी पांच वाजता त्यांच्या देहास अग्निसंस्कार देण्यात आला. विनोबाजींनी वेदमंत्र म्हटले. दृश्य भव्य होतें !

त्याच्या मृत्यूचा सविस्तर समाचार गांधीजींना कळविण्यांत आला. गांधीजी त्यावेळीं दिल्लींत होते. ता ५. ६ ४७ रोजी सायं-काळी प्रार्थना-प्रवचनात गांधीजींनी कोसम्बीचा गौरव केला – "जे आपली दौंडी पिटतात व पिटवतात, त्याना आम्ही खूप चढवतों. पण जे मूक सेवक आहेत, धर्माची सेवा करतात, त्याना लोक ओळखत सुद्धा नाहींत. असे एक आचार्य कोसम्बी होते. ते भारतातील प्रमुख विद्वान् होते. त्यानी स्वतः फकीरी पसत केली होती. त्याचे जीवन प्रार्थनारूप झाले होते. आम्हा सर्वांना त्याचे अनुकरण करण्यास ईश्वर शक्ति देओ !"



# ४६ उपसंहार

कोई देवता मरा न भगवान मर गया ।
शाहंशाह मरा न सुलेमान मर गया ।।
हिंदू कोई मरा न मुसलमान मर गया ।
इतनीसी बात है कि एक इन्सान मर गया ।।

सन १९४८ च्या जानेवारीत गाधीजींनी दिल्ली येथें आपल्या जीवनातील शेवटचा व "अलकारावरी मुकुटमणि" असा भव्य व पवित्र उपवास केला त्याच्या यशाच्या किरणानी स्वदेश व परदेश — सर्वत्र आशेचे व श्रद्धेचे वातावरण निर्माण केले सेवाग्राम आश्रमातही दिल्लीच्या खबरा येऊन पोचत होत्या आश्रम सोडून गाधीजींना बरेच दिवस झाले होते त्याच्या पुनर्भेटीसाठी आश्रमीय जन उत्कठित झाले होते. गाधीजीही पुन्हा आपल्या कुटुबात जाऊन राहाण्यासाठी उत्सुक झाले होते देश स्वतत्र होऊन साडेपाच महिने होत आले होते परतु समस्या अधिकाधिक जटिल होत होत्या परचक्रापेक्षा अत कलह अधिक भयावह असतात आश्रमातील एक कार्यकर्ते श्री शकरन् याची तरुण व एकुलती एक कन्या वारली त्यामुळे ते दु खी झाले होते. श्री किशोरलालभाईंनी पत्रद्वारा गाधीजीना ते वृत्त कळविले ता. २९ जानेवारी रोजी गाधीजींनी किशोरलालभाईना उत्तर लिहिले त्यात आपण शकरन्ना दुखवटयाचे पत्र पाठवल्याचे कळवून पुढे लिहिले की, "सेवाग्रामला येण्याचा माझा बेत अद्याप अनिश्चित आहे .... कदाचित् उद्या त्या बाबतीत निर्णय घेतला जाईल."

काल करे सो आज कर, आज करे सो अब ।
पल में परलय होत है, बहुरि करैगे कब ?।।

आपल्या मृत्यूची चाहूल गाधीजीना लागली होती असे वाटते. त्या सुमारास त्याचे तोडून सूचक वाक्यें निघत होती स्वत.च्या

निर्याणापूर्वी त्यानी शकरन्ना जे दुखवटयाचे पत्र पाठवले त्यातही "मी तुम्हाला काय लिहू ? तुम्हाला मी कोणते सात्वन देऊ शकतो ? मृत्यु हा खरा मित्र आहे आमच्या अज्ञानामुळेच आम्ही शोक करतो. सुलोचनेचे (शकरन्ची कन्या) चैतन्य काल होते, आज आहे, उद्याही असेल अलबत् शरीराचा नाश झालाच पाहिजे" – असेच उद्गार आहेत.

शेवटी जानेवारीची ३० तारीख उजाडली आश्रमातील मडळी नेहमीप्रमाणे आपल्या दिनक्रमात मग्न होती सायकाळचे भोजन आटोपले आणि वर्ध्याहून आश्रमात फोनवरून खबर देण्यात आली, "सायकाळच्या प्रार्थनेस जात असताना कोणा मनुष्यान बापूजीवर गोळ्या झाडून त्याचे प्राण घेतले ! !"

प्रथम ही खबर कोणास खरीच वाटली नाही, पण तिचे समर्थन करणारे सदेश येऊ लागले तेव्हा तिच्यावर विश्वास ठेवावाच लागला ! वर्ध्याचे कलेक्टर व पोलीस अधिकारी यानी येऊन सहानुभूति व्यक्त केली आश्रमवासियानी प्रार्थना केली नतर विचारविनिमय झाला मुन्नालालभाईंनी सुचवले की, या प्रसगी आश्रमातून कोणीतरी दिल्लीस जाऊन अन्त्ययात्रेत सामील झाले पाहिजे त्यानी स्वत जाण्याची तयारी दर्शविली व ते गेले त्याना गाधीजीचे अन्त्यदर्शन झाले, पण आश्रमवासियाना गाधीजीच्या भस्मदर्शनावरच समाधान मानून घ्यावे लागले पुढें पवनारच्या परिसरात, धाम नदीच्या पवित्र पात्रात त्या भस्माचे विसर्जन करण्यात आले ! तेव्हापासून दर वर्षी फेब्रुवारीच्या १२ तारखेस त्या जागी सर्वोदय मेळा भरत असतो

शेवटी गाधीजीचा देहोत्सर्ग आश्रमात न होता भारताची राजधानी नई दिल्ली येथें झाला ! आश्रमाच्या पुनीत जागेला हत्येच्या पातकाचा स्पर्श झाला नाही, हा ईश्वरी सकेतच समजला पाहिजे दिल्लीचा इतिहास मानवी क्रौर्य व रक्तपात यानी रगला आहे. तेथें पुरातन कालापासून अनेक राजकीय उलाढाली झाल्या

आहेत. राजकारणावर अध्यात्माचा प्रभाव पाडावा, मानवांत शांति व प्रेम यांचें साम्राज्य स्थापावें, एतदर्थ भगीरथ प्रयत्न करीत असतां आपल्या अपूर्व सत्याग्रही युद्धांत महात्मा गांधी गारद झाले ! त्यांच्या धवल यशोमंदिरावर एक देदीप्यमान कळस चढला ! ! खरोखरच ते देवांचे प्रिय व प्रियदर्शी होते !

० ०

सखियें वो आहेती उदंड वेडे,
ऐसे ते सज्जन थोडे ।
तयांची संगति जोडे, परमभाग्यें ।।
साहाती बोलणें उणें, न पुसतां सांगणें ।
समचि देखणें, उणें-अधिक नाहीं ।।
अभिमान नावडे, धांवती दीनांकडे ।
तयांचे जे उकिरडे, महाल त्यांचे ।।
रामी रामदास वास, पहातो रात्री-दीस ।
ऐसीयांचा सौरस, देई राघवा ।।

श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ।

निर्याणापूर्वी त्यानी शकरजीना जे दुखवट्याचे पत्र पाठवले त्यातही "मी तुम्हाला काय लिहू ? तुम्हाला मी कोणते सात्वन देऊ शकतो ? मृत्यु हा खरा मित्र आहे आमच्या अज्ञानामुळेच आम्ही शोक करतो. सुलोचनेचे (शकरजीची कन्या) चैतन्य काल होते, आज आहे, उद्याही असेल. अलवत् शरीराचा नाश झालाच पाहिजे" — असेच उद्गार आहेत

शेवटी जानेवारीची ३० तारीख उजाडली आश्रमातील मडळी नेहमीप्रमाणे आपल्या दिनक्रमात मग्न होती सायकाळचे भोजन आटोपले आणि वर्ध्याहून आश्रमात फोनवरून खबर देण्यात आली, "सायकाळच्या प्रार्थनेस जात असताना कोणा मनुष्याने बापूजीवर गोळ्या झाडून त्याचे प्राण घेतले ! !"

प्रथम ही खबर कोणास खरीच वाटली नाही, पण तिचे समर्थन करणारे सदेश येऊ लागले तेव्हा तिच्यावर विश्वास ठेवावाच लागला ! वर्ध्याचे कलेक्टर व पोलीस अधिकारी यानी येऊन सहानुभूति व्यक्त केली आश्रमवासियानी प्रार्थना केली नतर विचारविनिमय झाला मुन्नालालभाईनी सुचवले की, या प्रसगी आश्रमातून कोणीतरी दिल्लीस जाऊन अन्त्ययात्रेत सामील झाले पाहिजे त्यानी स्वत जाण्याची तयारी दर्शविली व ते गेले त्याना गाधीजीचे अन्त्यदर्शन झाले, पण आश्रमवासियाना गाधीजीच्या भस्मदर्शनावरच समाधान मानून घ्यावे लागले पुढे पवनारच्या परिसरात, धाम नदीच्या पवित्र पात्रात त्या भस्माचे विसर्जन करण्यात आले ! तेव्हापासून दर वर्षी फेब्रुवारीच्या १२ तारखेस त्या जागी सर्वोदय मेळा भरत असतो

शेवटी गाधीजीचा देहोत्सर्ग आश्रमात न होता भारताची राजधानी नई दिल्ली येथे झाला ! आश्रमाच्या पुनीत जागेला हत्येच्या पातकाचा स्पर्श झाला नाही, हा ईश्वरी सकेतच समजला पाहिजे दिल्लीचा इतिहास मानवी क्रौर्य व रक्तपात यानी रगला आहे. तेथे पुरातन कालापासून अनेक राजकीय उलाढाली झाल्या

आहेत. राजकारणावर अध्यात्माचा प्रभाव पाडावा, मानवात शांति व प्रेम याचे साम्राज्य स्थापावे, एतदर्थ भगीरथ प्रयत्न करीत असता आपल्या अपूर्व सत्याग्रही युद्धात महात्मा गांधी गारद झाले ! त्याच्या धवल यशोमंदिरावर एक देदीप्यमान कळस चढला ! ! खरोखरच ते देवाचे प्रिय व प्रियदर्शी होते !

० ०

सखिये वो आहेती उदंड वेडे,
ऐसे ते सज्जन थोडे ।
तयांची संगति जोडे, परमभाग्यें ।।
साहाती बोलणें उणें, न पुसतां सांगणें ।
समचि देखणें, उणें-अधिक नाहीं ।।
अभिमान नावडे, धांवती दीनांकडे ।
तयांचे जे उकिरडे, महाल त्यांचे ।।
रामी रामदास वास, पहातो रात्री-दीस ।
ऐसीयांचा सौरस, देईं राघवा ।।

श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ।

# पुरवणी

## सेवाग्राम आश्रमांतील सेवकांसाठी

गांधीजीच्या खोलीत एक सूचना-वही ठेवण्यात आली होती. वेळोवेळी सुचलेली शिकवण ते वहीत लिहून ठेवीत आश्रमातील सेवकांसाठी ठरीव ठशाची नियमावली त्यांनी कधीच तयार केली नव्हती पण आश्रमाचा कारभार चालू असताना विशेष परिस्थिति व घटना यांच्या प्रेरणेतून त्यांच्या मनात स्फुरलेली शिकवण ते वहीत टिपून ठेवीत आश्रमाचे व्यवस्थापक नंतर ती उतरून घेत व आपल्या सोबत्याकडे पोचवीत असत वेळोवेळी लिहिलेल्या सूचनांपैकी काही पुढें दिल्या आहेत –

ही गोष्ट आम्ही लक्षात ठेवावी –

थुकी ही सुद्धा मळ आहे म्हणून ज्या जागी आपण थुकतो किंवा अस्वच्छ हात धुतो तेथे भांडी केव्हाही घासू नयेत (६ ८ ३८)

माझी सल्ला आहे की सर्वांनी नेमाने सूत्रयज्ञ करावा या बाबतीत आम्ही अतिशय दक्ष राहिले पाहिजे (३ १ ४०)

खाण्याच्या बाबतीत प्रत्येकाने मर्यादा पाळणे जरूर आहे गूळ, तूप, दूध, भाजी यांचे प्रमाण असले पाहिजे एका वेळेस भाजी आठ औंस पुरेशी मानली पाहिजे जेवणात काही बिघडले तर जेवतेवेळी त्यावर टीका करणे असभ्यतेचे लक्षण आहे, म्हणून हिंसा आहे जेवणानंतर चिठीत लिहून व्यवस्थापकांना दाखवावे एखादा जिन्नस कच्चा राहिला तर टाकून द्यावा तेवढी भूक राहिल्याने कोणतेही नुकसान होणार नाही पण रागावू नये

सर्व कामें सावधपणे केली पाहिजेत आम्ही सर्व मिळून एक कुटुंब आहो, अशा भावनेने काम करून घेणे जरूर आहे (२२ १ ४०)

आजकाल मी जे काही लिहितो ते आज्ञारूप आहे असे मानू नये. आपल्या बुद्धीचा उपयोग करून सर्वजण जे करतील तेच खरे मानले जावे. (२४.१.४०)

मीठसुद्धा जरूरीपुरतेच घ्यावे पाणी देखील व्यर्थ खर्च करू नये. सर्व जण आश्रमातील प्रत्येक वस्तु आपली व गरीबाची आहे असे समजून चालतील, अशी आशा मी करतो. (३० १.४०)

लहानथोर कोणीही आपसात किंवा मुलीशी निरर्थक गप्पा-विनोद करू नये कामावरून बोलण्यात निर्दोष विनोदाला जागा आहे. ही एक कला आहे पहिली गोष्ट, कारण नसताना मौनच धारण करणे शुद्ध सभाषणाचे मूळ आहे.

आश्रमाच्या आसपास फार घाण असते म्हणून एका आश्रमवासियाने स्वच्छतेची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली पाहिजे..... अहिंसेत शौच (स्वच्छता) तर येतेच. (१५ ४.४१)

प्रत्येक मनुष्य जे काही करील ते विचार करून व विचारपूर्वक केले जावे जे काही करील त्यात ध्यानावस्थित व तन्मय होऊन जावे....

सर्व आहार औषध समजून व शरीराला निरोगी ठेवण्यासाठी घेतला जावा आणि शरीराचे रक्षणही सेवाकार्यासाठीच केले जावे. या दृष्टीने मनुष्याने मिताहारी किंवा अल्पाहारी झाले पाहिजे.

कोणीही रस्त्यात थुकू नये किंवा नाक साफ करू नये. अशी क्रिया एकान्त जागी, जेथें कोणाचे चालणे-फिरकणे नसते – तेथें करावी.

आश्रम पहावयास कोणी येतात किंवा आमचे पाहुणे बनतात तेव्हा आम्ही त्याचेवर प्रेम करावे त्याना परकेपणा वाटता कामा नये.

आश्रमात सर्व वस्तु आपापल्या जागेवर असल्या पाहिजेत आणि कोनाकोपरा स्वच्छ असला पाहिजे. दरवाज्यावर धूळ असता कामा नये ते मचकटही असू नयेत.

सामुदायिक कामात सर्वांनी पूर्ण हजीरी द्यावी; भांडी घासतांना खूप स्वच्छता असली पाहिजे.

संडास नेहमी कोरडे असले पाहिजेत. मळावर कोरडी धूळ नेहमी असावी.

प्रार्थनेंत जें कांही म्हटले जाते त्याचा अर्थ बरोबर समजून घ्यावा. आश्रमातील सर्व वस्तु स्वतःच्या आहेत असे समजून त्याचा सांभाळ करावा व त्याचा उपयोग करावा. (८.१२.४१)

आश्रमात सर्वत्र स्वच्छता व शांति असली पाहिजे. (१६ १.४५)

गोष्ट ही आहे की आम्ही आमचे जीवन विचारमय करावे. काम कमी करणे असेल तर कमी करावे, पण जें करावयाचे ते शक्य तो संपूर्ण करावें. म्हणूनच मी म्हटले आहे की, जर आपण गातो तसे आपले जीवन बनवू व सेवाग्रामला आदर्श बनवू शकू तर आम्ही सर्व केले असे होईल. (१९.१.४५)

• •